# अनुक्रमणिका

# आरंभीं

रसधारेंत बारा कवींच्या निवडक कविता संकलित केल्या आहेत. यापैकीं केशवसुत, माधवानुज, विनायक, चंद्रशेखर व बी याच्या पहिल्या कविता प्रथम हरिभाऊ आपट्याच्या करमणुकींत प्रसिद्ध झाल्या. करमणूक १८९० सालीं विजयादशमीला प्रथम बाहेर पडली. तेव्हा या काळाचा आरभ १८९० पासून धरला आहे. या कवींपैकीं बालकवि १९१८ मध्यें, गोविंदाग्रज व टिळक १९१९ मध्यें व रेंदाळकर १९२० मध्यें दिवंगत झाले. तेव्हा १९२० हा या कालखंडाचा अत धरला आहे.

१९२० नतर चद्रशेखर, बी, ताबे व लक्ष्मीबाई टिळक ही मंडळी विद्यमान होती. ताबे व लक्ष्मीबाई टिळक याच्या प्रतिभेला तर यापुढेंच बहर आला होता. परतु या सर्वांचा पिंड या पूर्वींच बनला होता. त्यात सहसा बदल होणें शक्य नव्हते. त्याचे विचार व संकेत ठरून गेले होते. म्हणून त्याचा अतर्भाव वरील काळातच केला आहे.

या कालखडातील कवितेंतून देशभक्ति, समाजोन्नति, गृहासक्ति व निसर्गप्रीति हे अंतःप्रवाह प्रामुख्यानें वाहताना दिसतात. तेव्हा ते समोर ठेवून निरनिराळ्या कवींच्या त्या त्या प्रकारच्या कविताची निवड केली आहे. विद्यार्थ्यांनीं केवळ त्याच्यावरच विसबून राहू नये. या कवींचे कवितासग्रह अभ्यासाच्या दृष्टीनें वाचावेत. या उद्देशानें शेवटीं विस्तृत टीपा जोडल्या आहेत आणि आरंभीं या कालखंडातील कवितेचें स्वरूप विशद करणारी प्रस्तावना जोडली आहे. त्याचा उपयोग झाल्यास संपादकाच्या श्रमाचें चीज होईल.

हा संग्रह तत्परतेनें प्रसिद्ध केला याबद्दल प्रकाशकाना जितके धन्यवाद द्यावे तितके थोडेच आहेत !

अमरावती
९-९-१९५३

भवानीशंकर श्री. पंडित

# प्रास्ताविक

[ १८९०–१९२० ]

गेल्या शतकाच्या शेवटच्या दशकापासून तों चालू शतकाच्या पहिल्या दोन दशकापर्यंत आधुनिक कवितेच्या बहिरंगात व अंतरंगात न भूतो न भविष्यति असें परिवर्तन घडून येत होतें. या परिवर्तनाची गति इतकी वेगवती होती आणि तिच्या द्वारा उत्पन्न होणारी संस्थिति इतकी सुसंस्कृत आणि उन्नत होती कीं, या परिवर्तनास कित्येकदा क्रांति म्हणण्याचा मोह होतो. कांहींजण या परिवर्तनास क्रांति म्हणत नाहींत. त्यांच्या मतानुसार हें परिवर्तन म्हणजे उत्क्रांति होती. महाराष्ट्रांत इंग्रजी राज्याची प्राणप्रतिष्ठा झाली, तेव्हापासून परक्या राज्यकर्त्यांनीं या देशांत जी विचारप्रणालि आणली, तिचा आमच्या आचारावर व उच्चारावर क्रमशः प्रभाव पडत गेला. तो या सुमारास डोळ्यांत ठसेल आणि मनांत बसेल अशा रीतीनें गोचर झाला एवढेंच. तेव्हां या परिवर्तनास क्रांति न म्हणतां उत्क्रांति म्हणावें असें त्यांना वाटतें. वस्तुतः सृष्टिशास्त्रांतील क्रांति आणि जीवनशास्त्रांतील उत्क्रांति हे दोन शब्द प्रयुक्त केल्यामुळें हा निरर्थक शाब्दिक वाद माजला आहे. परिवर्तन हा निसर्गाचा नियम आहे. क्वचित् तें क्रमशः होत असतें. क्वचित् तें वेगानें होतें. तें होतें त्यास केवळ व्यक्तिच जबाबदार नसते. त्यामध्यें त्या काळाचा आणि परिस्थितीचा वाटाहि फार मोठा असतो. तोच प्रकार या तीस वर्षांच्या काळांत झाला. हा काळ आधुनिक कवींच्या तिसऱ्या पिढीचा होय. टिळक पतिपत्नी, केशवसुत, माधवानुज, चंद्रशेखर, विनायक, बी, तांबे व दत्त हे या पिढींतील अग्रगण्य कवि या काळाच्या सुरुवातीस विशींत पंचविशींत किंवा तिशींत होते. प्रतिभेच्या पहिल्या उद्रेकानंतर बहुधा याच वयांत प्रत्येक कवीच्या काव्याला एक विशिष्ट दिशा अथवा एक विवक्षित वळण लागत असतें. तेंच पुढें स्थायी होतें. त्यांत सहसा फारसा बदल होत नाहीं. उपर्युक्त कवि वयानें ज्येष्ठ, तर गोविंदाग्रज, रेंदाळकर व बालकवि हे

कनिष्ठ. या कनिष्ठ कवींच्या कवितेचा प्रवाह नव्या व निराळ्या दिशेनें वाहत नसल्यामुळें त्याचा या ज्येष्ठातच समावेश होतो.

हा काळ या देशाच्या इतिहासात जनजागृतीचा होता. देश इंग्रजांच्या दारुण दास्यांत खितपत पडल्याला जवळ जवळ पाऊणशें वर्षे लोटलीं होतीं. या पाऊण शतकातील जनतेला इंग्रजी राज्य म्हणजे ईश्वरी वरदान वाटत होतें. देशाची स्थिति एकाद्या थडगार गोळ्याप्रमाणें झाली होती. या अवनत स्थितीचा परिणाम तत्कालीन साहित्यावर झाला आहे. साहित्याचा इतिहास म्हणजे त्या त्या कालखंडातील आणि त्या त्या परिस्थितींतील मानवाच्या भावना, विचार आणि चित्तवृत्ति याचा इतिहास होय. साहित्य हें मानवसमाजाच्या आश्रयाने राहात असतें. त्याला निराळें अस्तित्व नाहीं. तेव्हा मानवसमाजाच्या इतिहासात उत्थापन व पतन याचा जो नियम आहे तोच त्याच्या आश्रयानें राहाणाऱ्या साहित्यास लागू होतो. मानवसमाजाच्या उत्कर्षाबरोबर त्याच्या आसऱ्यात राहाणाऱ्या साहित्याचा उत्कर्ष होतो. त्या समाजाचा ऱ्हास झाला कीं साहित्याचा ऱ्हास होतो. या पाऊणशे वर्षांतील पहिल्या दोन पिढ्याचें काव्य-साहित्य त्याज्य अथवा उपेक्षणीय खास नाहीं. परतु तिसऱ्या पिढींतील कवींच्या कवितात जी अंतःस्फूर्ति आहे, विचारात जें तेज आहे अथवा वाणींत जें ओज आहे त्याचा आढळ या पूर्वींच्या पिढींतील कवितात होत नाहीं. त्या कविता प्रोत्साहक, प्रेरक अथवा प्रभावोत्पादक नाहींत. त्या मुळात उत्साहहीन व चैतन्यशून्य आहेत. तिसऱ्या पिढींतील कविता याच्या अगदीं उलट आहे. ती तशी का याचाच प्रस्तुत विचार करावयाचा आहे.

तिसऱ्या पिढींतील कविता ही एकदम आशादायक, ऊर्जस्वल व सत्त्वसपन्न आहे. तिच्या या स्वरूपाचें मूळ कांहींजण तिच्या बहिरगात शोधण्याचा प्रयत्न करतात. वास्तविक बहिरगातील अनेक प्रयोग व सुधारणा दुसऱ्या पिढींतच झाल्या होत्या. यमकाच्या बाबतींत खरे, नायडू, महाजनी इत्यादिकानीं प्रयोग केले होते. पल्लेदार वाक्यरचना व उच्चारानुसारी लेखन याचा उपयोग चिंतामणिपेठकर व कुटे यानीं केला होता. बालानंद

किंवा चंद्रकात यासारख्या जातींचा किंवा नाटकातील पदाच्या चालींचा किंवा त्याकाळीं घरोघर प्रचलित असलेल्या मुद्रिका, उद्धव, अक्रूर इत्यादि पौराणिक पदाच्या चालींचा अवलब कीर्तिकर, महाजनी, कानिटकर आदींनीं केला होता. तिसऱ्या पिढींत हे प्रयत्न कमीजास्ती व्यापक प्रमाणात झाले असतील इतकेंच. किंवा,

हे दिन–हाय !—
हे दिनचिंताचे परतु लटिकें हसण्याचे !

अथवा,

किती थोडके ! परी कसे ते गळति–पहा ते पळती
माझ्या बोटामधुनि, सागरा जाती,
माझ्या नेत्रामधुनि, आसवें चलति–आसवें गळती

अशा अर्धविषमचरणाच्या रचनेची त्याच्यात नवीन भर पडली असेल किंवा,

Rosebud–rosebud–rosebud, red
Rosebud brightly blooming

या मूळ ओळींच्या सहीसही अनुकरणानें

गुलाबाचि कळी
गुलाबाचि कळी
गुलाबाचि कळी बहारदार !

अशी काहींशी सैल स्वैर रचना पहिल्यादाच निर्माण झाली असेल, पण म्हणून या नव्या पिढींतील कवितेचें सत्त्व या रचनाविषयक नावीन्यात होतें असें म्हणता येत नाहीं. दुसरे काहींजण तिचे मूळ इंग्रजी कवितेच्या अनुकृतींत पाहातात. परंतु दुसऱ्या पिढींतच Choice works of Poets, Palgrave's Golden Treasury आणि Mackey's One Thousand And one Gems of English Poetry या ग्रंथाचा प्रसार झाला होता. आणि त्यातील वेंचक कविताचा आस्वाद प्रामुख्यानें महाजनींनीं आणि अनुषगानें भडारे, पद्नाभ, मोडक, चिटणीस, पावण-स्कर, मुळे, भवाळकर इत्यादिकानीं त्यावेळेच्या रसिक वाचकास चाखवला

होता. प्रधान व कीर्तिकर यानीं तर इंग्रजी खंडकाव्यें मराठींत आणलीं होतीं. तेव्हा तिसऱ्या पिढीचा हा प्रयत्न नवा होता असे मुळींच नाहीं. फार तर 'प्रत,' 'अपत्याच्या निधनकाळीं' या प्रकारचे इग्रजी मथळे व कविताच्या खालीं त्याच नमुन्याचे स्थलकालनिर्देश याच्या नवीनतेची कदाचित् अधिक भर पडली असेल. तात्पर्य, या बहिरगातील बदलामुळें तिसरी पिढी फुटून निघते हा जो समज आहे तो काहीं पटत नाहीं. प्रत्येक पुढची पिढी ही आपल्या मागच्या पिढीची अशतः ऋणानुबधी असते. या सत्याला अनुसरूनच तिसऱ्या पिढीनें हे रचनाप्रयोग दुसऱ्या पिढीकडून घेतले, व्यापक प्रमाणात पुढें चालवले आणि त्यात कमी-अधिक भर घातली.

तिसऱ्या पिढींतील एक अग्रगण्य कवि केशवसुत यानींच रचनाविषयक सुधारणा प्रथम केल्या असा जो क्वचित् सूर कानीं पडतो, तो अर्थातच इतिहासाला धरून नाहीं. केशवसुतानीं पहिली कविता १८८५ सालीं लिहिली. त्यापूर्वींच म्हणजे १८८३ मध्ये दुसऱ्या पिढीनें हें कार्य झालें होतें केशवसुतानीं कवितालेखनास आरभ केला, त्यापूर्वीं दुसऱ्या पिढीचें हें कार्य त्यानीं लक्षात घेतलें होतें या सबधींचा पुरावा आहे भृग किंवा मित्राची खोली पाहून या कवितावर मणिबधाच्या चालीवर किंवा जलधरमालेच्या चालीवर असे जे निर्देश केले आहेत ते त्यानीं कीर्ति-कराच्या इदिरेवरून घेतले आहेत. कविता आणि कवि या साध्या सरळ कवितेंत त्यानीं स्वभावभूयिष्ठ हा जो अगडबब शब्द पेरला आहे तो वि. ज्ञा. विस्ताराच्या एप्रिल ते जुलै १८८५ च्या जोड अंकातील इदिरेच्या परी-क्षणामधून घेतला आहे. जयाजीराव शिंदे व तुकोजीराव होळकर ही त्याची कविता त्या प्रकारच्या कविता लिहिण्यात सिद्धहस्त असलेल्या मोगऱ्याच्या कवितावरून स्फुरली आहे. कारण वि. ज्ञा. विस्ताराच्या एप्रिल व ऑगस्ट १८८६ च्या अकात मोगऱ्याच्या याच विषयावरील कविता आल्या आहेत. केशवसुताप्रमाणेंच या पिढींतील दुसरे एक अग्रगण्य कवि ताबे यानींहि दुसऱ्या पिढींतील कवींचें कार्य लक्षात घेतलें होतें याविषयीं पुरावा आहे. ताबे हे आधुनिक कवितेंतील उत्कृष्ट पदाचे प्रणेते होत. अभिमन्यु ही

त्याची आवडती जुनी पुराणी चाल आणि जादुगारिणी हा त्याच्या एका गीतातला शब्द त्यानीं ऑगस्ट १८९१ च्या वि. ज्ञा. विस्तारात पद्मनाभ याचें She is not fair to the outward view या Coleridge च्या एका गीताचें पुढील रूपातर प्रसिद्ध झालें आहे त्यावरून घेतला आहे,:—

नयन सखि तुझे । तुझे ग जादुगरणी
पाहुनिया आलि मला घेरणी ॥

नसे ती नारी । नारि गोड दिसण्या
जशा बहु माधुकड्या रमण्या ॥

जेव्हा हो परि हसली । हसालि गोड गालीं
तिची मज जादुगिरी कळली ॥
अहा ! त्या नयनीं—। नयनिं चमके बिजली
तिथें जणुं प्रेमनदी मुरली.

साराश, तिसऱ्या पिढींतील कवींनींच रचनाविषयक सुधारणाना आणि इग्रजी स्फुट कविताच्या रूपातराना हात घातला आणि त्यामुळें आधुनिक कवितेचें स्वरूप आमूलाग्र पालटलें असें म्हणणें इतिहासास सोडून होईल.

तर मग तिसऱ्या पिढींतील कवींची कविता इतकी भावनोत्तेजक, उत्साह-वर्धक आणि परिणामकारक असण्याचें कारण काय ? वस्तुतः याला अनेक कारणें आहेत. परतु त्या सर्वांची मोजदाद येथें मर्यादित अवकाशात आणि थोड्या वेळात विस्ताराने करता येणें शक्य नाहीं. याला प्रमुख व प्रभावी कारण म्हणजे येथील समाजात अकल्पित व अकस्मात् अवतीर्ण झालेला व्यक्तिवाद होय. येथे इग्रजी राज्य प्रस्थापित झाल्यानतर हळुहळू त्याच्या शाळा उघडल्या, त्यातून त्याच्या वाङ्मयाचा अभ्यास होऊ लागला, त्याची विचारसरणी अनेक बाबतींत नवी व निराळी असल्या-मुळें ती मनास आवडू लागली आणि शासनात त्याच्याशीं साक्षात् संबध आल्यामुळें त्याच्या ठिकाणीं असलेल्या गुणाबद्दल आदर व अवगुणांबद्दल तिटकारा निर्माण झाला. या सर्वांचा परिणाम आमच्या जीवनावर झाला आणि त्याचाच पडसाद आमच्या तत्कालीन वाङ्मयातून उमटला.

आपण व आपले देशबांधव परक्यांचे गुलाम आहोंत याची तीव्र जाणीव होताच तिकडील इतिहासातील देशभक्तीचा ( Patriotism ) संचार आमच्या नसानसातून होऊ लागला. आम्ही स्वातंत्र्याचे उपासक बनलों. आम्हाला फक्त देशस्वातंत्र्यच नको होतें. त्याबरोबर आम्हाला व्यक्तिस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य व लेखनस्वातंत्र्यहि हवें होतें. त्या दिशेनें खटाटोपहि होत होते. देशात १८८५ पासून राष्ट्र-सभेची स्थापना झाली होती. तिच्याद्वारा आम्ही आमचीं गाऱ्हाणीं सरकारपुढें ठेवून दाद मागत होतों. महाराष्ट्रात चिपळूणकरानीं आपल्या लेखणीनें तरुणाच्या अतःकरणात स्वत्व व स्वाभिमान याचा अग्नि प्रज्वलित केला होता. त्याच्या पावलावर पावले ठेवून लोकमान्य टिळक व आगरकर पुढें आले होते. १८८१ पासून टिळकाचा केसरी आणि १८८८ पासून आगरकराचा सुधारक महाराष्ट्राला राजकीय व सामाजिक विचार देत होते. त्याच्याद्वारा हळुहळू दोन विचारप्रणालींच्या दोन शाळा जन्मास येत होत्या. घरात वर्तमानपत्रें आणि बाहेर नित्य नवीं नवीं आदोलनें यामुळे साऱ्या समाजात एक प्रकारचें चैतन्य खेळत होतें. न्यायमूर्ति रानडे सरकारी नौकरींत असल्यामुळे जरी प्रत्यक्ष या आदो-लनात भाग घेत नव्हते, तरी आतून त्याची सहानूभूति व साहाय्य असे. थंडगार पडलेल्या गोळ्याला ते अप्रत्यक्ष रीतीनें आकार देत होते. त्या स्वातंत्र्योत्सुक वातावरणात आपणदेखील काहींतरी करून दाखवावें असें भावनोत्कट कविहृदयाना वाटलें असल्यास नवल तें काय ? केवळ कवींनाच नाहीं, तर या वेळेच्या निबंधकाराना, नाटककाराना आणि कादबरी-कारानाहि असेंच वाटले. कारण स्वातंत्र्यलालसा हाच तेव्हाचा युगधर्म होता. आणि म्हणूनच केशवसुतापासून तो ठोमऱ्यापर्यंतच्या काव्यात या अदम्य लालसेचे कमीअधिक सूर ऐकू येतात. जनतेंतील चेतना जागृत ठेवण्या-साठीं पुढे, तीस वर्षांत गणेशोत्सव, शिवाजीउत्सव, वगभग, स्वदेशी, स्वावलंबन, राष्ट्रीय शिक्षण व बहिष्कार इत्यादि ज्या चळवळी झाल्या, त्या सर्वांचें स्वागत या कवींनीं केलें आहे असें त्याचे कवितासंग्रह चाळून पाहिल्यास निदर्शनास येईल. जनता सनदशीर चळवळीबरोबर कधीं कधीं

दहशतवादाकडे धाव घेई. अशा वेळीं सरकारची दडपशाही सुरू होई. तिचा उपसर्ग पोचू नये म्हणून या काळची कांहीं कविता रूपकाच्या भाषेत किंवा पर्यायोक्तीनें निर्माण झाली आहे.

राजकीय स्वातंत्र्य हे काही जनतेच्या हातीं नव्हतें. परतु सामाजिक स्वातंत्र्य हें तिच्या हातीं होतें. समाजात अनेक निर्बंध होते, रूढी होत्या आणि अनाचार होते. या सर्वांचें शुद्धीकरण होणें किंवा त्याच्या जागा नवीन सुधारणाना देणें आवश्यक होतें. तेव्हा बालविवाह, विधवाविवाह, जरठकुमारीविवाह, प्रौढविवाह, प्रेमविवाह, स्त्रीशिक्षण जातिभेद इत्यादिकासंबधींच्या चळवळी चालू होत्या. स्वतत्रता, समता, बधुता, न्याय व उन्नति या दृष्टींनीं व्यापक अशा मानवतावादावर आधारलेल्या विचाराना याचवेळीं मधून मधून चालना मिळत होती. अस्पृश्यतानिवारण, सहभोजनें, आर्थिक विषमता इत्यादि चळवळी यापैकींच होत. यातील आरभींच्या सुधारणाना बऱ्याच प्रमाणात आणि नंतरच्या सुधारणाना कांहीं प्रमाणात या कवींच्या कावितात स्थान मिळाले आहे. अत्याचार असल्यास या कावितांचें स्वरूप टीकापर व सुधारणा असल्यास सहानुभूतिपर आहे.

कवि हे कवितेच्या नादात आपल्याशींच निमग्न असतात असा जो एक अपसमज आहे तो या कवींच्या बाबतींत निरर्थक आहे कारण दुष्काळ, दैन्य किंवा प्लेगासारखे दुःख यावर या कवींनीं पुष्कळ लिहिलें आहे. या युगांतील हरिभाऊ आपट्याच्या ‘ कसे दिवस गेले ? ’ किंवा ‘ काळ तर मोठा कठिण आला, ’ या कथा जशा प्लेग व दुष्काळावर आहेत, तशाच माधवानुज, चंद्रशेखर, तांबे व दत्त यानीं या प्रसगावर कविता लिहिल्या आहेत.

राजकीय व सामाजिक स्वातंत्र्याच्या लालसेंतूनच येथील सुशिक्षित वर्गाच्या अंतःकरणात व्यक्तिस्वातंत्र्याची ज्योत प्रदीप्त झाली होती. राज्यकर्त्यांच्या देशात किंवा अमेरिकेंत जी लोकशाहीची पद्धति आहे, तिच्यात समाजातील प्रत्येक व्यक्तीला जें सुनियत्रित परतु व्यापक विचार, आचार व उच्चारस्वातंत्र्य आहे तसें तें येथें असावें असें या शिक्षित वर्गास वाटत होतें. पुन्हा इग्रजी साहित्याच्या परिशीलनामुळें ही वृत्ति

दिवसेंदिवस अधिकाधिक बळावत होती. या दृढ वृत्तीमुळें शिक्षित वर्गास इरतऱ्हेच्या सामाजिक आणि खासगी दडपशाहीचा अतिशय तिरस्कार असे. याच सुमारास राज्यकर्त्यांनीं या देशात दळणवळणाचीं जीं नवीन साधनें निर्माण केलीं होतीं आणि ज्या यांत्रिक सुधारणा केल्या होत्या, त्याच्यामुळें आमची जुनी समाजरचना विस्कळित होत होती. एकत्र कुटुंबपद्धतीची जागा विभक्त कुटुंबपद्धति घेत होती, जुन्या समजुती व चालीरीती याना खो मिळत होता आणि वाढत्या स्त्री-शिक्षणामुळें पूर्वी समाजात स्त्री व पुरुष याच्यात जो पडदा होता तो आता हळुहळू बाजूला सरकत होता. शासनव्यवस्थेतील शांतता, सुबत्ता व सुरक्षितता या व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनेला पोषकच होत्या. तेव्हा नव्या कुटुंबव्यवस्थेंत व्यक्ति ही स्वतंत्र बनली आणि स्वावलंबनामुळें तिच्या विचारात तेज आणि वाणींत ओज संचार करू लागले. तिचें स्वत्व उदयाला आलें. तिचा स्वाभिमान जागृत झाला. आणि जर का कोणीं त्याला धक्का लावला, तर अंतःस्फूर्तीच्या ( inspiration ) उसळीसरशीं तिच्या अंतःकरणातील खोल अशा वृत्ति उचंबळून येऊं लागल्या, आणि मुखावाटे सहजोद्गार बाहेर पडूं लागले. पूर्वीच्या पिढींतील कवि व्यक्तिमत्त्वाला पारखा होता. या पिढींतील कवीचें व्यक्ति-मत्त्व त्याच्या काव्यात प्रतिबिंबित होत होते. पूर्वीचा कवि तिऱ्हाइताच्या नात्यानें इंग्रजी कवितेचें भाषांतर किंवा रूपांतर करीत होता. आताचा कवि त्या कवितेतील भावनेशीं समरस होऊन त्या धाटणीवर एखादी कविता लिहीत होता किंवा सर्वस्वी स्वतंत्र असें एखादें गीत गात होता. राज्यकर्त्यांनीं या देशात नव्यानेंच आणलेल्या मुद्रणयंत्रामुळें आतां दिवसें-दिवस गद्य बाळसेंदार होत होतें. पद्याची चहा कमी होत होती. अशा प्रसंगीं केशवसुतासारख्या स्वयंसपन्न कवीला Scott च्या The Lay of the last Minstrel वरून काव्यस्फूर्ति होत होती. परंतु ती तिऱ्हाइत-पणाची नव्हती. ती तादात्म्याची होती:—

> " Old times were changed, old manners gone,
> A wandering Harper, scorned and poor,

He begged his bread from door to door,
And turned to please a peasant's ear,
The harp, a King had loved to hear

या ओळींवरूनच

गाणें जे परिसावया कविपुढें राजेशही वाकले

हे उद्‌गार स्फुरत होते. आणि

Then he would sing achievements high,
And circumstances of chivalry,
And noble youth, the strain to hear,
The pitying dutchess praised its chime,
And gave him heart, and gave him time

या ओळींवरून

आशा, प्रेम तसेंच वीर्य कवनीं तो आपुल्या गाइल;
गेलें वैभव गाउनी स्फुरण तो युष्मन्मना देइल,
द्या उत्तेजन हो कवीस, न करा गाणें तयाचे मुकें

या ओळी स्फुरत होत्या. जुन्या कवींचे विचार नवे तर ते व्यक्त करण्याचे वळण जुनें होतें. उलट नव्या कवीचे विचार जसे नवे तसें तें व्यक्त करण्याचें वळण नवेंच होतें. तेव्हा साहजिकच दुसऱ्या पिढींतील कवितेच्या विचारात, भावनात आणि भाषेंत जे सामर्थ्य, जें सौदर्य आणि आणि जें ऐश्वर्य अनुभवास येत नाहीं तें तिसऱ्या पिढीतील कवितेत प्रत्यक्ष दिसतें.

या पिढीने काव्यलेखन हेंच आपलें जीवितकार्य आणि ध्येय निश्चित केलें होतें. काव्यविषयाशीं ती अगदीं एकजीव झाली होती. याच्या साक्षी तिच्या कवितासंग्रहात व पत्रव्यवहारात सापडतात. या पिढीला कवितेचें इतकें 'वेड' होते कीं, केशवसुत, चद्रशेखर, दत्त व रेंदाळकर यानीं तिच्यावर वनितेचा आरोप करून तिला निरानिराळ्या प्रकारानीं आळविलें आहे. तेव्हा प्रेरक परिस्थिति आणि भावनेची प्रबळ स्फूर्ति याच्या समन्वयानें या पिढीची कविता निर्माण झाली असल्यामुळें ती अत्यंत उत्कट आहे.

भावनेच्या आवेगात निर्माण झालेली ही कविता अर्थातच अनलंकृत आहे. तिच्यात वृत्तवैचित्र्य आहे, भाषावैभव आहे आणि विचाराची विविधता आहे. परतु कलाकुसर कमी आहे. चद्रशेखरासारखा एकादा कवि या विधानास अपवाद असेल. पण एकदर कविता कृत्रिम कला॰ कुशलतेपेक्षा स्वाभाविक भावनेवर अधिष्ठित असल्यामुळें सहजसुदर व मूळ-मधुर उतरली आहे.

स्थूलमानाने ही कविता दोन प्रकारानीं आभिव्यक्त झाली आहे. कवि ज्यात स्वत:शींच चिंतन करीत स्वत:लाच काव्यविषय बनवतो आणि स्वत:ला आवडतील अशा विचाराचें वातावरण उत्पन्न करतो, तो पहिला प्रकार, आणि ज्यात बाह्य जगाशीं अथवा अन्य व्यक्तीशीं आपला संबध प्रस्थापित करून त्याच्याविषयीं सहकप प्रकट करतो, तो दुसरा प्रकार. कधीं कधीं या दोन्ही प्रकाराचा सुदर सयोग होऊन एक तिसराच प्रकार प्रत्ययास येतो. केशवसुताच्या भृग, फुलपाखरू, पुष्पास आदि कविता या तिसऱ्या प्रकारात मोडतात. पहिल्या प्रकारातील अतर्मुखता आणि दुसऱ्या प्रकारातील बाहिर्मुखता याच्या मीलनानें या प्रकारात भावना व कल्पना याची सरभिसळ होत असते. कित्येकदा ती स्पष्ट व व्यवस्थित होत नाहीं. पुन्हा तिच्यात सूत्रबद्ध भाषेची भर पडते. तेव्हा या प्रक रच्या कावेताचा आस्वाद घ्यावयास रसिकानें कवीच्या मन:स्थितीशीं एकरूप होणें आवश्यक असतें. केशवसुताच्या उपर्युक्त कवितातील वस्तु निसर्गातील असल्या, तरी त्या कविता निसर्गविषयक नाहींत हे काहीं आलोचकाच्या ध्यानात आलेलें नाहीं. वस्तुस्थिति अशी आहे कीं, या पिढींतील कवींनीं स्वानद व स्वच्छद कवितालेखन केलें आहे. तें करताना कवितेचा वर्गविशेष अथवा प्रकारविशेष याकडे त्याचें काटेकोरपणानें लक्ष नव्हतें. कारण त्याना कविता निर्माण करावयाची होती. कवितेचे विषयवार वर्ग किंवा काव्यप्रकार निर्माण करावयाचे नव्हते.

ही कविता भावनेंतून प्रस्फुरित झाल्यामुळें साहजिकच त्रुटित व सुटसुटीत आहे. तिच्यातून बहुधा मनोलेखन व तत्त्वविवेचन झालें आहे. मनोलेखनाचें कारण या पिढींतील कवींची प्रवृत्तिपरता होय. पुन्हा

इंग्लिश समाजाच्या संसर्गानें स्त्रीकडे पाहण्याचा उदार व दक्षिणदृष्टि-कोणहि आणखी एक कारण आहे. तो या पिढींतील कवींचे कविता-संग्रह चाळल्यास चटकन् दृष्टीस पडेल. गोविंदाग्रज व रेंदाळकर या वयानें कनिष्ठ असलेल्या कवींच्या काव्यात थोडा निराळा दृष्टिकोण दिसेल. याचें कारण प्रेमभावनेची त्याची व्यक्तिगत कल्पना व तिची विफलता यात आहे. स्त्रीपुरुषप्रेमाचे साकार स्वरूप जें वात्सल्य त्याचेंहि दर्शन टिळक-पतिपत्नी, तांबे, दत्त व बालकवि याच्या कवितात होईल.

निसर्गाविषयींची ओढ हा या पिढींतील कवींच्या काव्याचा आणखी एक विशेष आहे. तो अर्थातच वर्डस्वर्थ किंवा इमर्सन् याच्या वाचनानें आला आहे. या काव्यात तत्त्वविवेचनाची आवड दिसते, ती पश्चिमेकडील आहे.

‘ जेथें ओढे बनराजी । वृत्ति रमे तेथें माझी ’

किंवा,

‘ बरें राहणें निर्जन रानीं । ओढ्यासंगें गाणें गाणीं ’

अथवा,

‘ सखये या स्थानीं
बसावे वाटे दिनरजनी
पर्णकुटी बाधुनि तरुतलीं
गिरिवर हरिभजनीं

किंवा,

‘ निर्झरमय काननमय गायनमय दिव्य जाहला देह ’ हे उद्‌गार त्याच तत्त्वचिंतनातून बाहेर पडले आहेत.

या कवींच्या काव्यविषयक विवेचनात कित्येकदा केशवसुताचा संप्रदाय हा प्रयोग कानीं पडतो. केशवसुत हे या पिढींतील एक प्रतिभासपन्न अग्रेसर कवि होते हें खरें. त्याच्या वाणींत प्रोत्साहक पौरुष व सजीवक चैतन्य आहे यात शंका नाहीं. परतु स्वतः त्यानीं एकाद्या विशिष्ट मतप्रणालीच्या प्रचाराकरिता असा एकादा संप्रदाय काढला होता असा इतिहासात

कुठेंहि आधार नाहीं. केशवसुत दिवंगत झाल्यावर मनोरंजन पु. ११ भा.७ मध्यें त्याच्यावर आणि त्याच्या काव्यावर जो पहिलाच लेख आला, त्यात, किंवा आपट्यानीं त्याची कविता पुस्तकरूपानें प्रसिद्ध केल्यावर डॉ. गुणे, रहाळकर व प्रि. वै. का. राजवाडे यानीं त्याच्या समालोचनपर जे लेख लिहिले त्यात, कुठेंहि हा प्रयोग आढळत नाहीं. केशवसुताच्या पश्चात् १९१३ मध्यें गोविंदाग्रजानीं प्रथम मनोरजनात ‘ केशवसुत कसले मेले ? केशवसुत गातचि बसले ’ आणि ‘ केशवपुत्राचा महशूर — गोविंदाग्रज चेला सच्चा ’ असे उद्गार दोन निरानिराळ्या कवितात काढून त्या सप्रदायाची मुहूर्तमेढ रोविली आणि एक तुतारीमडळ स्थापन केलें. बालकवि, भालचद्र आणि कीर्तने हे या मडळाचे सदस्य होते. रे टिळकाचा या मडळाशीं अर्थाअर्थीं काहीं सबध नव्हता हें त्यानीं मनोरजनात बालकवींवर जो मृत्युलेख लिहिला आहे त्यावरून स्पष्ट होईल. पुढें १९२० च्या आगेमागें ‘ आधुनिक कविपचक ’ प्रसिद्ध झालें. आणि ‘ केशवसुताचा सप्रदाय ’ हा प्रयोग सर्रास होऊ लागला.

वस्तुत: टिळक, केशवसुत, माधवानुज व विनायक याचा एकमेकाशीं चागला घनिष्ट सबध होता. १९०७ च्या जळगावच्या कवि-समेलनात ठोमऱ्याना बालकवि ही पदवी मिळाली. त्यात टिळक, माधवानुज, चद्र-शेखर, विनायक, ताबे, बालकवि हे उपस्थित होते. दत्त व केशवसुत हे या पूर्वींच दिवगत झाले होते. केशवसुत हे उज्जयनीला आपल्या बधूकडे जाताना वाटेत इदुरास ताब्याना भेटले होते आणि त्याच्या ‘ गेली ज्योति विझोनिया ’ या सॉनेटची प्रशसा केली होती असें रहाळकरानीं नमूद केलें आहे. याच्यापेक्षा वयानें कनिष्ठ असलेल्या गोविंदाग्रज व बालकवि याचा स्नेहसबध सुप्रसिद्धच आहे. हे काहींसे समवयस्क व समकालीन सर्वच कवि मनानें निर्मल, निर्मत्सर व निरभिमान होते. म्हणूनच टिळकानीं केशवसुताना उद्देशून तीन कविता लिहिल्या आहेत आणि ‘बीं’ नीं कविवदन या आपल्या कवितेंत गोविंदाग्रज व बालकवि याच्या प्रतिभेचा गौरव केला आहे.

या कवींच्या कविता एकाच काळीं आरंभीं काव्यरत्नावलि व करमणूक यांतून आणि पुढें सुविचारसमागम व मनोरंजन यातून प्रसिद्धि

पावत होत्या. तेव्हा त्या एकमेकाच्या दृष्टीला पडत होत्या आणि त्याचें थोडेंफार अनुकरण होत होतें. केशवसुताचे ' सतारीचे बोल ' आणि विनायकाच्या ' सुगध 'किंवा पहिल्याची 'पृथ्वी स्वर्ग आणि मनुष्य' आणि दुसऱ्याच्या 'ध्यास तो भास' या कवितेतील एक कल्पना यात विलक्षण साम्य आहे. केशवसुताची दिवाळी आणि दत्ताची दिवाळी याचा आरंभ सारखा आहे. ' लुटपुटीच्या घरिंदारीं-लटकिच झाल्यें संसारी ' ही केशवसुताच्या 'हरपले श्रेय'तील कल्पना दत्ताच्या बाललेखनातील ' लटुपुटिचें घरदार पुढें आलें ' या कल्पनेशीं मिळती जुळती आहे. दत्ताच्या कविता अगोदरच्या आहेत. केशवसुताप्रमाणें माधवानुजानीं पद्यपक्ति रचल्या आहेत आणि सुनीतें लिहिलीं आहेत. ताब्यानींहि सुनीतें लिहिलीं आहेत. अशा प्रकारें माधवानुज व ताबे यानीं आपल्या सहकाऱ्यानें आणलेल्या एका काव्यप्रकारास साहाय्य केले आहे. म्हणून ते त्याच्या संप्रदायात होते असें म्हणता येत नाहीं. केशवसुताचीं सुनीते मिल्टॉनिक पद्धतीचीं होतीं. त्यांचा आरभ निवेदनात्मक आहे. परतु ताब्यानीं शेक्सपिरिअन पद्धतीचें सवेदनात्मक सहजोद्गारी सुनीत लिहिताच केशवसुतानीं त्याच पद्धतीचें ' आम्ही कोण ? ' हें सुनीत लिहिले हा इतिहास लक्षात घेणें आवश्यक आहे. ताब्याचे ' गेली ज्योति विझोनिया ' हें सुनीत आणि केशवसुताचें ' आम्ही कोण ? ' हें सुनीत जवळ जवळ ठेवून वाचल्यास केशवसुता-सारख्या अग्रगण्य कवीनें आपल्याहून सात आठ वर्षांनीं ल्हान असणाऱ्या ताब्याची प्रशसा का केली तें कळेल. चद्रशेखराची ' दुर्व्यसनी गृहस्थाची गृहिणी ' ही आरभींची कविता आणि ताब्याची ' मार्गप्रतीक्षा ' ही आरंभींची कविता या दोन कवितात सारखेपणा आहे, केशवसुताचा ' झपूर्झा ' आहे तर ' बीं 'चा पिगा आहे, केशवसुताची ' तुतारी ' आहे तर टिळकाचें 'रणशिंग,' बींचा 'डका', गोविंदाग्रजाचा 'दसरा' आणि बालकवींचा 'धर्मवीर' आहे. यात परस्परानुकरण आहे यात शंका नाहीं. परतु या बाबतींत अनुकृति हा स्वभाव आहे आणि तो उत्तम आहे, आणि प्रतिकृति हा विकार आहे आणि तो अधम आहे हें सत्य लक्षात घेतलें पाहिजे, एकाद्या ठिकाणीं अनेक ततुवाद्यें असलीं आणि त्यावरून वायूची

एकादी लहर निसटली कीं, ज्याप्रमाणें त्याचे स्वर परस्परातून प्रतिनादित होऊं लागतात त्याचप्रमाणें समकालीन कवींच्या कवितात सुसवाद कानीं पडतो.

वास्तविक विचार केला तर या सर्व कवींचा पिंड आपआपल्या परी स्वतत्र होता. आणि यापैकीं प्रत्येकानें आधुनिक कवितेला काहींना काहीं विशेष प्रदान केलें आहे. टिळकानीं तिला तत्त्वज्ञान दिले, तर लक्ष्मीबाईनीं तिच्यात प्रेमळपणा ओतला. केशवसुतानीं तिला अतर्मुखता शिकविली, तर माधवानुजानीं तिला काव्यमय बोध कसा असतो हें दाखविलें. चंद्रशेखरानीं तिला आकर्षक निवेदनपद्धति सागितली, तर विनायकानीं तिला राष्ट्रवादाचे महत्त्व पटवून दिलें. बींनीं तिला वैचारिकता दिली, तर ताब्यानीं तिला भावनिकता अर्पण केली दत्तानीं तिला वत्सलतेची जाणीव करून दिली, तर गोविंदाग्रजानीं तिला कल्पनेचा साज चढविला रेंदाळकरानीं तिच्या पायातील शृखला दूर केल्या, तर बालकवींनीं सृष्टीचें सौदर्य तिच्या निदर्शनास आणलें. तात्पर्य, या बारा कवींनीं तिला सर्वांगीण सुदर करण्याच्या प्रयत्नाची पराकाष्ठा केली आहे. तिचे तें सर्वांगीण सुदर स्वरूप त्या काळीं जसें लोकप्रिय होतें, तसेंच तें आजदेखील आहे. तेंच आधुनिक कवितेचें खरेंखुरे रूप आहे असें आजहि रसिक ओळखतात.

—भ श्री पंडित.



# रे. नारायण वामन टिळक

## १ : कुणास्तव कुणीतरी

सरोष घन वर्षती, तरुलतांशिं वारा झुजे,
विराम नच ठाउका क्षणहि नाचतांना विजे;
भयानकचि संचरे सकल सृष्टि हो घाबरी
कुणास्तव कुणीतरी सभय वाट पाहे घरीं !

स्वप्रतिरवामुळे बधिर जीव सारे जरी;
निनाद करिते अहा ! श्रवण चाहुलीचा तरी;
उठे दचकुनी तडित् दुसरि नर्तनाला करी,
कुणास्तव कुणीतरी कितिक येरझारा करी !

खुशाल कर वृष्टिला, तुज न तो भिणारा घना !
पिशाचसम तू खुशाल कर गे विजे नर्तना !
महीधर समीरणा ! धरुनि लोळवीं भूवरी,
कुणास्तव कुणीतरी निघत यावयाला घरीं !

घनप्रसर माजला, नभिं न एक तारा दिसे,
परंतु हसरा सदा सुखद चंद्र गेहीं वसे;
अहा द्रववितां कुणा सहज चंद्रकान्ताप्रती
कुणास बघुनी कुणीतरि हसेल हर्षे किती !

अहा चरणधावना कलशपूर्ण उष्णोदकें
रुचिप्रद वरान्न जे करिल हो सुधेला फिके !
फुलांहुनि मऊ असे शयन रम्य मंचावरी,
कुणास्तव कुणीतरी घरिं अशी तयारी करी.

रसाळ वचनावली विविध तोडिं लावावया
मिळेल, उपमा उरे मग न भोजनाला तया
पडेल मग विस्मृती सकलही श्रमांची क्षणीं,
कुणाप्रति कुणीतरी निरखिता प्रसन्नेक्षणीं !

तया प्रणयनिर्झरा प्रणयनिर्झरीला तिला
सदा सुखद भोवरा विहरण्यास ऐशा मुला
बळेंच उठवी कुणी ! उभयतांस आलिंगुनी
कुणीतरि धरील तें विषय अन्य कैंचा मनी !

तमास अपसारुनी उन पडेल त्या मदिरीं,
तशांत पडतील हो मधुनि पावसाच्या सरी,
कुणीतरि धरोनियां कर करीं कुणाचा तरी,
स्तवील परमेश्वरा जलद, सूर्य ज्याच्या करीं



## २ : केवढें हें क्रौर्य !

क्षणोक्षणिं पडे, उठे परि बळे, उडे बापडी,
चुके पथहि येउनी स्तिमित दृष्टिला झांपडी;
किती घळघळां गळे रुधिर कोमलांगांतुनी,
तशीच निजकोटरा परत पातली पक्षिणी·

म्हणे निजशिशूंप्रती ‘अधिक बोलवेना मला,
तुम्हांस अजि अंतिंचा कवळ एक मी आणिला;
करा मधुर हा ! चला ! भरविते तुम्हां एकदा
करो जतन यापुढे प्रभु पिता अनाथा सदा !

अहा! मधुर गाउनी रमविले सकाळी जनां,
कृतघ्न मज मारितील नच ही मनी कल्पना!
तुम्हास्तव मुखी सुखे धरुनि घांस झाडावरी
क्षणैक बसले न तो, शिरत बाण माझ्या उरीं!

निघून नरजातिला रमविण्यांत गेले वय,
म्हणून वधिले मला! किती दया! कसा हा नय!
उदार बहु शूर हा नर खरोखरी जाहला
वधून मज पांखरा निरपराध की दुर्बला!

म्हणाल भुलली जगा, विसरली प्रियां लेकरां,
म्हणून अतिसंकटे उडत पातले मी घरा,
नसे लवहि उष्णता, नच कुशीत माझ्या शिरा,
स्मरा मजबरोबरी परि दयाघना ईश्वरा.'

असो; रुधिर वाहुनी नच भिजो सुशय्या तरी
म्हणून तरुच्या तळी निजलि ती द्विजा भूवरी;
जिवंत बहु बोलके किति सुरम्य ते उत्पल
नरें धरुनि नाशिले, खचित थोर बुद्धी, बल.

मातीत ते पसरले अतिरम्य पंख,
केले वरी उदर पांडुर निष्कलंक!
चचू तशीच उघडी, पद लांबवीले,
निष्प्राण देह पडला, श्रमही निमाले!



## ३ : बोंबाबोंब

खालीं वरती जावे यावें । विश्वनियम, हे सकला ठावें;
पतनावांचुन । नच उत्थापन; । कां मग बोंबाबोंब ?

किती युगांची नीज असेना—। उघडीले ना अती नयना ?
मरणावांचुन । नच संजीवन; । कां मग बोंबाबोंब ?

विषवृक्षांचे मळे लाविले, । निजरुधिराने जरी शिंपिले,
तरी संप्रती । कुऱ्हाड हातीं ! । कां मग बोंबाबोंब ?

चिखल फांसिला कलश घांसिला, । अधिकाधिक तो उज्ज्वल झाला,
मानहती ती । मानप्राप्ति । कां मग बोंबाबोंब ?

अमोघफलदा या अनुभूति, । मूल्यावांचुन लभ्य न जगतीं,
केला विनिमय । अवघा हितमय, । का मग बोंबाबोंब ?

भिन्न दिशांही सरिता, नाले, । किती जरी हे वाहत गेले,
एक नदीपति । सकलां पुढतीं; । का मग बोंबाबोंब ?

अंधाराचा सर्व पसारा । खरा, परंतू त्यांतच तारा—
या इवलाल्या । खुदूं लागल्या; । का मग बोंबाबोंब ?

किती वादळे आलीं गेलीं, । तरी नाव जी नाही फुटली,
दूर जरी तट, । तरि ही बळकट । कां मग बोंबाबोंब ?

गेलों मेलो ठार बुडालो ! । क्यौं यह बकवा ? ' जय जय ' बोलो
नैराश्योद्भव । आशावैभव; । का मग बोंबाबोंब ?

होतें जें जे, आहे जे जें, । ते ते स्मृतिगत मात्र विराजे;
काल सनातन, । तसेच आपण; । कां मग बोंबाबोंब ?



*

## ४ : महारथी

तुझ्यासम महारथी बघुन एकला निष्क्रिय,
अहर्निश मला गड्या, परमदुःख हो विस्मय;
पुढे रथ विलोलसा, सुखद, दिव्य संसार हा !
पहा, न मुनिसारखा जगिं उगा बसोनी रहा.

बनेन तव सारथी तुज जपेन जीवापरी,
असो सरल मार्ग, वा गिरि असो, असो वा दरी;
जगज्जनकयोजना, तशि मदीय उद्योगिता
रथा सबल अश्विनी, करुं नको विलंबा अतां !

पहा 'इह' 'परत्र' हीं उभय रम्य चक्रे किती !
न केवळ विभूषणे,परि रथास देती गति;
सदा तुजपुढे उभा जुळुन मी करां सारथी,
त्यजून भय, हो पुढे ! धर बन्धू सुवीरा धृति !

तुला मृदु विशेषणीं कवि सदैव संबोधिती,
म्हणून दिसते मला तवहि भीरु झाली मति,
पुरे ! त्यजुनि मोह हा समजुनी स्वरूपा निजा
स्वकार्यरत हो बन्धू ! अनुग सारथी मी तुझा !



## ५ : माझ्या जन्मभूमीचें नांव

सृष्टी तुला वाहुनी धन्य ! माते, अशी रूपसम्पन्न तू निस्तुला
तूं कामधेनू ! खरी कल्पवल्ली ! सदा लोभला लोक सारा तुला;
या वैभवाला तुझ्या पाहुनीयां मला स्फूर्ति नृत्यार्थ होते जरी
सामर्थ्य नामी तुझ्या आर्यभूमी, तसे पाहिले मी न कोठे तरी !

माते ! महात्मे तुझे, तत्त्ववेत्ते, तुझे शूर योद्धे, तुझे सत्कवि,
श्रेणी ययांची सदा माझिया गे मना पूजनीं आपुल्या वांकवी !
यांचीं यशे ज्या नव्या सद्गुणांना मला अर्पिती, ध्येय ते गे जरी,
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी, तसे पाहिले मीं न कोठे तरी !

तझ्या महोदार सारस्वताच्या महासागरींचा जरी मीन मी
झालो, तरी गे तृषा मन्मनाची कधीही कधीही न होणे कमी !
आई ! गुरुस्थान अन्ती जगाचे तुझे ! यात शंका न कांही जरी
सामर्थ्य नामी तुझ्या आर्यभूमी, तसे पाहिले मीं न कोठे तरी !

वारा तुझ्या स्पर्शने शुद्ध झाला मला लाधला ! भाग्य हे केवढे !
माते ! स्वये देशि जे अन्नपाणी, सुधा बापुडी कायशी त्यापुढे !
तूं बाळगीशी मला स्कन्धि अंकी ! सुखाची खरी हीच सीमा पुरी !
सामर्थ्य नामी तुझ्या आर्यभूमी, तसें पाहिले मीं न कोठे तरी !



## ६ : लोकमित्र

खरोखर लोकमित्र ते

सेवक आपण सकल जनाचे, ।
स्वप्नी ठाउक अन्य न अपुले ज्यांस जगीं नाते.

उदार हृदयें गभीर वृत्ति, । जी जीवी ती सत्यीं प्रीति;
रविमंडलही भेदुन भूता संतत शोभे ते !

रुची न ज्याची भिकार वित्तीं, । बुद्बुद केवळ ज्यांना कीर्ति,
कार्य न ज्याच्या क्षणही चित्ती लोकहितापरते.

लोकहितीं पितयाची चिंता, । संवर्धनिं मातेची ममता,
धरिती जनपरिचर्या करितां सृष्टीसम समते.

जनसेवा ही ईश्वरसेवा, । याविण दुसरा हेतु न ठावा,
प्रेम आणखी देव दिसावा एक सदा ज्यांते

धन्य ! धन्य ! या धन्य विभूति ! । प्राप्ती यांची स्वर्गप्राप्ति !
देवा ! यांची भारतजगती वाट सदा बघते !



# लक्ष्मीबाई टिळक

## १ : कल्पना, विचार, शब्द

गाणे माझ्या अवडीचे
बोला फुटक्या कवडीचे
एक लकेरी गाण्याची
ऐका खरि तर वेडीची
ताल सूर ना त्या कांही
वेडयांचे गाणे हेही
आई वेडी बाप पिसा
बाळ जन्मला तोहि तसा
सर सर वर वर आइ चढे
भर भर येउन खालिं पडे
बाप पहातो तिच्याकडे
तोही गिरवी तेच धडे
पोर तयांचे अजाण ते
कांहींतरि बडबड करिते
खरी कल्पना ती आई
भर भर भर भर वर जाई
ती पडतां मग बाप पुढे
विचार डोळे मिटुन रडे
आइ धडपडी बाप रड्या
शब्द पोर मग मारि उड्या

हे असलें गाणे माझे
मज वेडीस खरे साजे
गाणे माझ्या अवडीचे
बोला फुटक्या कवडीचे.



## २ : मी तुझी मावशी तुला न्यावया आलें

ही भरली घागर तुझ्या शिरावर बाळे !
तू उभी ? लागले कुठे कुठे तव डोळे ?
ही गाडी वाजे खड खड खड खड दूर,
हे इकडे उडते धड धड तवही ऊर !
तूं प्रसन्न आता, क्षणे खिन्न तूं होशी,
मेघात गवसला चंद्रच दुसरा दिसशी !
तूं अल्लड साधी पोर ! लाडके,
गुरुजने कल्पिली थोर ! लाडके,
तुज कशास हा संसार ? लाडके,
हा दोन दिवस तरि टळो म्हणोनी झाले
मन अधीर गेले माहेरा तव गेले !

माहेरीं आपण भाउबिजेला जाऊं,
येतील न्यावया बाबा अथवा भाऊ,
हें प्रौढपणाचें ओझे फेकुन देऊं
सुचतील तेवढे खेळ खेळुनी घेऊं

ही मनांत तुझिया बाई ! वासना
मी ओळखिले का नाहीं ? सांग ना !
भर बघू पुन्हां अश्रूंही ! लोचना
ये हासत आतां आलिंगी मज बाळे !
मी तुझी मावशी तुला न्यावया आले !



## ३ : कावळा

" सकाळी उठोनी तुझी काव काव
भजशी का देव सांग मला "

" देवाला भजतो, तुला ऊठवीतो
नेम मी पाळीतो सदा त्याचे "

" काळा रंग तुझा कशाने रे झाला
का रे तूं खेळला कोळशांत

अगावरी कोणीं ओतीली का शाई
काळा काळा होई रंग तूझा "

" नाही रे शाईचा नव्हे कोळशाचा
देवाच्या इच्छेचा रंग माझा "



## ४ : धुंधुर्मासाची खिचडी

शिंदी रुसली बिंदीसाठीं फिंदारुनि केसा
म्हणे मला द्या बिंदी आणुनि मग बांधिन केसा

बिंदी कसली दोरी बांधुनि भर बाजारांत
विकितो आतां तुला लावितो घरच्या कामांत

पिंप्री ती तो झिप्र्या सोडुनि वाटेवरि आली
थप्पड बसतां फोड ये तिला लालिलाल झाली

तिच्या कारणे जटा वाढवुनि वड जोगी झाला
ध्यान कराया आसन घालुनि तो रानीं बसला

पिंपळ लागे भाऊ त्याचा त्यास राग आला
दो हाताला चोळुनि काढी अग्नीच्या ज्वाला

फणसाला हे सारे कळना उभारला कांटा
जांभुळ पडले काळेठिक्कर ऊस घेइ सोटा

डाळिंबाला हसूं लोटले ते विचकी दांतां
शिताफळाचे डोळे थकले हे बघतां बघतां

भगवा झेंडा धरून हातीं कोकणात जाई
तीनच पाने चवथे नाही, पळस खिन्न होई

संपत्तीला उधळुन अपुल्या अंगाला राख
लावुन बसला जन त्या भीती म्हणाति करा खाक

शेराला ती रुई मिळाली सवाइनी शेर
त्या दोघांच्या जवळी बसला काळा शिरजोर

पिता तयाचा हिरवा, आई हळदीचा उंडा
पुत्र जन्मला काय करंटा सदा काळतोंडा
काजू, त्यांच्या भावासम तो सारखीच करणी
चिडके वरुनी गोड अंतरी करिती मनधरणी

कशास नांवे ठेवा यांना उपयोगी पडती
दुखल्या खुपल्या साह्य कराया धावुनिया येती !



# केशवसुत

( कृष्णाजी केशव दामले )

## १ : मजुरावर उपासमारीची पाळी

धारेवरी जाउनि देव पोचला,
हा रंगही मावळतेस साजला,
सर्वत्र ही मौज पहा ! दिसे, परी
माझ्याच कां दुःख भरे बरे उरी ?

साऱ्या दिनी आजचिया नसे मुळीं
हातास माझ्या कवडीहि लाभली;
पोटा, करोनी मजुरीस मी भरी;
कोणी दिले आज न काम हो परी !

ही मन्दिरे हो खुलतात चांगलीं;
माझ्या वडीलीच न काय बाधिली ?
मी मात्र हो आज मरे भुकेमुळे,
श्रीमंत हे नाचति मन्दिरी भले !

हेवा तयांचा मजला मुळी नसे,
जाडी मला भाकर ती पुरे असे;
कष्टात देवा ! मरण्यास तत्पर
कां मारिसी हाय ! भुकेमुळें तर ?

सर्वांस देवा ! बघतोसि सारखा,
होतोस कां रे गरिबांस पारखा ?

कांहीस सुग्रास सदन्न तूं दिले,
साधी अम्हां भाकरही न कां मिळे ?

घेवोनि चारा अपुल्या पिलांप्रती
जाती अहा ! पक्षि सुखी घरीं किती;
बाळांस हे दावुनि कारभारिण
कैसे तयां देत असेल सांगून ?—

"पक्षी जसे हे घरव्यास चालती
घेवोनि चारा अपुल्या पिलाप्रती,
घेवोनि अन्ना, तुमचा तसा पिता
येईल तो लौकरि हो, रडूं नका !"

हे लाडके ! आणिक लाडक्यांनो !
दावू तुम्हां तोड कसे फिरोन ?
जन्मास मी काय म्हणोनि आलो ?
येतांच वा का न मरोनि गेलो ?

जानेवारी १८८९



## २ : रा. रा. बळवंत आपाजी दाते यांस

दाते ! धन्य तुझी तुला प्रसवुनी माता असे जाहली,
ज्या अर्थीं हृदयीं तुझ्या वसतसे भूमातृभक्ती भली;
त्वन्नेत्रीं चमके तडित् अभिनयी वारे अहा ! खेळतें,
उद्‌गारांतुनि गर्जना निघुनियां ती या जना स्तम्भिते !

जोराची तव शब्दवृष्टि पडतां आत्म्यावरी माझिया,
चिन्ताग्रीष्म समग्रही धुपुनियां तो जाय तेथूनियां,
"देशालागुनि अपुल्या सुदिन ते येतील केव्हां तरी,"
आशांचे असल्या सदकुर पहा ! येती मदात्म्यावरी !

होती श्रेष्ठ पदास आर्यजननी जी एकदां पावली,
दुर्दैवे परि जी विपद्गणशतीं सख्या असे गाजिली,
तीचे दु:ख जरा तरी शमविण्या, आम्हांस या भूवरी
ढाळायास सखेद लोचनजले तू धीर आज्ञा करीं !

टाकी हाणुनि आमुची शिथिलता वक्तृत्ववज्रे तव,
स्फूर्तीने निज त्या स्वबाधवजना सामर्थ्य दे तू नव;
"ऐसें बांधव काय हो बघतसां ! आतां उठा लौकरी !"
कर्तव्यास जनांस जागृत करीं शब्दी अशा निर्भरी !

"हे आम्ही उठलो ! चला तर पुढे ! देशार्थ कार्यीं मरूं !"
या त्वत्प्रेरित रे समुत्सुक वचीं व्योमावकाशा भरूं !
"जैजैकार असो तुझा भरतभू ! " हा घोष जेव्हां करूं;
जैजैकारुनि नामही प्रिय तुझे दाते ! तधी आदरू !

पुणें, १८८९



## ३ : सिंहावलोकन

मुखा फिरवुनी, जरा वळुनि पाहता मागुती,
कितीक हृदये वदा चरकल्याविणे राहती ?
'नको वळुनि पाहणे !' म्हणुनि दृग् जरी आवरूं,
धुकें पुढिल जाणुनी मन न घे तसेही करूं !

प्रदेश किति मागुते रुचिर ते बरें टाकिले,
कितीक तटिनीतटे श्रम जिथे अम्हीं वारिले;
किति स्मृतिस धन्यतास्पद वनस्थली राहिल्या,
जिथे धवलिता निशा प्रियजनासवे भोगिल्या !

सुखे न मिळतील ती फिरुनि !—तीं जरी लाविती,
मनास चटका, तरी नयन त्यावरी लोभती.
परन्तु हृदयास जे त्वरित जाउनी झोंबती,
प्रमाद, दिसतां असे, नयन हे मिटूं पाहती !

किती घसरलो !—किती चुकुनि शब्द ते बोललो !—
करूनि भलते किती पतित हत ! हे जाहलो !
स्वये बहकुनी उगा स्वजनमानसे टोंचिली !—
वृथा स्वजनलोचनीं अहह ! आंसवे आणिलीं !

चुकोनि घडले चुको ! परि, ' असे नव्हे हे बरे '
वदूनिहि कितीकदां निजकरेंचि केले बरे !—
म्हणूनिच अम्हांपुढे घनतमिस्र सारे दिसे,
पुढे उचलण्या पदा धृति मुळीहि आम्हां नसे !

" चुकी भरुनि काढणे फिरुनि, हे घडेना कधीं "
विनिष्ठुर असे भरे प्रगट तत्त्व चित्तामधी !—
म्हणूनि अनिवार हे नयनवारि जे वाहते,
असे अहह ! शक्त का कवणही टिपायास ते ?

वळणें, ३ मे १८९०



## ४ : क्षणांत नाहींसे होणारे दिव्य भास

आत्माराम सुखे वनामधुनि तो होता जरा हिंडत,
तो झाला बघता दुरूनि सहसा कोण्या सुमूर्तिप्रत;
तीच्यामागुनि मोहुनी हळूहळू जायास तो लागला,
" आहे ही पण कोण ? " या क्षणभरी प्रश्नावरी थांबला.

" रम्भे ! " " उर्वशि गे !"–तशीच दुसरीं जीं त्यास होतीं प्रियें
नामे, त्यांतिल घेउनी फिरुनि तो बाही त्वरेने तिये;
ती कांही तरिही वळे न, बघुनी तो विस्मया पावला;
जातां सन्निध, " ही नवीनचि अहा ! कोणी दिसे " बोलला !

काही नांव नवीन देउनि तिला जेव्हां तये बाहिले,
तो तीने वळुनी प्रसन्न वदने त्याच्याकडे पाहिले;
त्या रूपद्युतिने दिपूनि नयने निर्वाण तो पावला,
तो अन्तर्हित, दृष्टिचा विषय तो एका क्षणी जाहला !

आकाची इतुक्यांत हांक परिसे आत्मा, घराला वळे;
आकाच्या हुकुमात, साक्ष अवघी ती विस्मरूनी, रुळे;
कोणेका दिवशी तिथेच फिरतां ती गोष्ट त्याला स्मरे,
तच्चित्ती, पण रूप नाम अथवा तीचे मुळीही नुरे !

आत्माराम सखेद होउनि वदे तो आपणाशीं असे––
" काही सुन्दर देखिले खचित मीं, यामाजि शंका नसे !
हा ! हा !–हे जर सर्व भास धरतां येतील माते, तर
पृथ्वीचा सुरलोक की बनवुनी टाकीन मी सत्वर ! "

मुंबई, २४ मार्च १८९३



## ५ : नवा शिपाई

नव्या मनूंतिल नव्या दमाचा शूर शिपाई आहे,
कोण मला वठणीला आणू शकतो ते मी पाहे !
ब्राह्मण नाहीं, हिंदुहि नाही, न मी एक पंथाचा,
तेच पतित की जे आंखडिती प्रवेश साकल्याचा !

खादाड असे माझी भूक,
चतकोराने मला न सूख;
कूपातिल मी नच मंडूक;

मळ्यास माझ्या कुंपण पडणे अगदी न मला साहे !
कोण मला वंठणीला आणूं शकतो ते मी पाहे !

जिकडे जावे तिकडे माझीं भावडे आहेत,
सर्वत्र खुणा माझ्या घरच्या मजला दिसताहेत,
कोठेही जा—पायाखालीं तृणावृता भू दिसते,
कोठेही जा—डोईवरते दिसते नीलांबर ते !

सांवलींत गोजिरीं मुले,
उन्हांत दिसती गोड फुले,
बघतां मन हर्षून डुले,

तीं माझीं, मी त्याचा,—एकच ओघ अम्हांतुनि वाहे !
नव्या मनूंतिल नव्या दमाचा शूर शिपाई आहे !

पूजितसे मी कवणाला ?—तर मी पूजीं अपुल्याला,
आपल्यामध्ये विश्व पाहुनी पूजी मी विश्वाला;
' मी ' हा शब्दच मजला नलगे, संपुष्टी हे लोक
आणुनि त्यो, निजशिरी ओढिती अनर्थ भलते देख !

लहान–मोठे मज न कळे,
साधु–अधम हे द्वयहि गळे,
दूर–जवळ हा भाव पळे;
सर्वच मोठे–साधु–जवळ, त्या सकली मी भरुनी राहें !
कोण मला वठणीला आणूं शकतो ते मी पाहे !

हलवा करितां तिळावर जसे कण चढती पाकाचे,
अहस्फूर्तिच्या केन्द्राभवते वेष्टन तेवि जडाचे,
आंत समचि निर्गुण तिलक, वरी सदृश सगुण तो पाक,
परि अन्यां बोचाया धरितो काटे की प्रत्येक !
अशी स्थिती ही असे जनी !
कलह कसा जाइल मिटुनी ?
चिंता वागे हीच मनीं.
शान्तीचे साम्राज्य स्थापूं बघत काळ जो आहे.
प्रेषित त्याचा नव्या दमाचा शूर शिपाई आहे !

८ मार्च १८९८

## ६ : सतारीचे बोल

काळोखाची रजनी होती,
हृदयी भरल्या होत्या खंती;
अधारांताचि गढले सारे
लक्ष्य, न लक्षी वरचे तारे;
विमनस्कपणे स्वपदे उचलित,
रस्त्यांतुनि मी होतो हिंडत,
एका खिडकीतुनि सूर तदा
पडले–दिड दा, दिड दा, दिड दा !

जड हृदयीं जग जड हे याचा;
प्रत्यय होता प्रगटत साचा;
जड ते खोटे हे मात्र कसे
ते न कळे, मज जडलेच पिसे
काय करावे, कोठे जावे,
नुमजे मजला की विष खावे !
मग मज कैसे रुचतील वदा
ध्वनि ते–दिड दा, दिड दा, दिड दा !

सोसाट्याचे वादळ येते,
तरि ते तेव्हा मज मानवते;
भुते भोवती जरि आरडती
तरि ती खचितचि मज आवडती;
कारण आतिल विषण्ण वृत्ति
बाह्य भैरवी धरिते प्रीति,
सहज कसे तिज करणार फ़िदा
रव ते–दिड दा, दिड दा, दिड दा !

ऐकुनि ते मज जो त्वेष चढे,
त्यासरशी त्या गवाक्षाकडे
मूठ वळुनि मी हात हिसकिला;
पुटपुटलोही अपशब्दांला;
म्हटले–"आटप, आटप मूर्खा !
सतार फोडुनि टाकिसी न कां !
पिरपिर कसली खुशालचदा,
करिसी–दिड दा, दिड दा, दिड दा !"

सरलो पुढता चार पावलें;
तो मज न कळे काय जाहले;
रुष्ट जरी मी सतारीवरी
गति मम वळली तरि माघारीं;
ध्वनिजाली त्या जणूं गुंतलो
असा स्ववशता विसरुनि बसलो--
एका ओव्यावरी स्थिर तदा
ऐकत-दिड दा, दिड दा, दिड दा !

तेथ कोपरे अंकी टेकुनि
करांजलीला मस्तक देउनि
बसलो, इतुक्यामाजी करुणा—
रसपूर्ण गती माझ्या श्रवणां
आकर्षुनि घे, हृदय निवाले,
तन्मय झाले, द्रवले, आले--
लोचनातुनी तोय कितिकदां
ऐकत असता-दिड दा, दिड दा !

स्कन्धी माझ्या हात ठेवुनी
आश्वासी मज गमले कोणी,
म्हणे-" खेद का इतुका करिसी ?
जिवास का बा असा त्राससी ?
धीर धरीं रे !-धीरा पोटी
असती मोठी फळे गोमटी !
ऐक, मनींच्या हरितील गदा
ध्वनि हे-दिड दा, दिड दा, दिड दा ! "

आशाप्रेरक निघूं लागले
सूर तधी मी डोळे पुशिले;
वरती मग मी नजर फिरविली,
नक्षत्रे तो अगणित दिसली;
अस्तित्वाची त्याच्या नव्हती
हा वेळवरी दादच मज ती !
"तम अल्प-द्युति बहु" या शब्दा
वदती रव ते-दिड दा, दिड दा !

वाद्यातुनि त्या निघती नंतर
उदात्ततेचे पोषक सुस्वर;
तो मज गमले विभूति माझी
स्फुरत पसरली विश्वामाजी;
दिक्कालांसहि अतीत झालो;
उगमी विलयी अनन्त उरलो;
विसरुनि गेलो अखिलां भेदा
ऐकत असतां दिड दा, दिड दा !

प्रेमरसाचे गोड बोल ते
वाद्य लागतां बोलायाते,
भुललो देखुनि सकलहि सुन्दर,
सुरागना तो नाचति भूवर,
स्वर्ग धरेला चुम्बायला
खाली लवला-मजला गमला
अशा वितरिती अत्यानंदा
ध्वनि ते-दिड दा, दिड दा, दिड दा !

शान्त वाजली गती शेवटी
शान्त धरित्री, शान्त निशा ती,
शान्तच वारे, शान्तच तारे,
शान्तच हृदयी झाले सारे !

असा सुखे मी सदना आलो,
शान्तीत अहा ! झोपी गेलो,
बोल बोलले परी कितिकदा
स्वप्नी–दिड दा, दिड दा, दिड दा !

२० मार्च १९००



## ७ : फुलपांखरूं

जेथे हिरवळ फार विलसते,
लताद्रुमाची शोभा दिसते,
तेथे फुलपाखरू पहा हे—
सुंदर बागडते !

कलिकावरुनी, पुष्पांवरुनी,
गन्धयुक्त अवकाशामधुनी,
पुष्पपरागा सेवित हिंडे—
मोदभरे करुनी !

तरल कल्पना जशी कवीची,
सुन्दर विषयांवरुनी साची
भ्रमण करी, गति तशीच वाटे—
फुलपांखराची !

वा मुग्धेची जैशी वृत्ति
पतिसहवासस्वप्नावरती
विचरे फुलपांखराची तशी--
हालचालही ती !

निर्वेधपणे इकडे तिकडे
वनश्रीतुनी अहा ! बागडे,
त्याचा हेवा हृदयी उपजुनि
मन होई वेडे !

तिमिरीं आम्हीं नित्य रखडणे,
विवचनांताचि जिणे कठणे,
पुष्पपतंगस्थिति ही कोठुनि—
आम्हाला मिळणे !

असे यास का चिन्ता काही ?
यास 'उद्यां' चा विचार नाही,
अकालीच जो आम्हा न्याया—
मृत्युमुखी पाही !

बहु सौख्याची कुसुमित सृष्टि,
तींत वसे हे, न कधी कष्टी,
ग्रीष्माचे खर रूप विलोकी—
नच याची दृष्टि !

'सर्व विनाशी असती प्राणी,'
ही मज खोटी वाटे वाणी,
फूलपांखरूं—मरण पाहिले—
आहे का कोणी ?

जे रम्य ते बघुनियां मज वेड लागे,
गाणे मनांत मग होय सवेंचि जागे,
गातो म्हणून कवनीं फुलपांखराते,
व्हायास सौख्य मम खिन्न अशा मनाते.



## ८ : आम्ही कोण ?

आम्ही कोण म्हणूनि काय पुससी ?—आम्ही असूं लाडके—
देवाचे, दिधले असे जग तये आम्हांस खेळावया,
विश्वीं या प्रतिभाबले विचरतो चोहीकडे लीलया,
दिक्कालातुनि आरपार अमुची दृष्टी पहाया शके !

सारेही बडिवार येथिल पहा ! आम्हापुढे ते फिके;
पाणिस्पर्शच आमुचा शकतसे वस्तूप्रती द्यावया—
सौंदर्यातिशया, अशी वसतसे जादू करांमाजि या,
फोले पांखडितां तुम्ही, निवडतो ते सत्त्व आम्ही निके ।

शून्यामाजि वसाहती वसविल्या कोणी सुरांच्या बरें ?
पृथ्वीला सुरलोकसाम्य झटती आणावया कोण ते ?
ते आम्हीच सुधा कृतीमधुनिया ज्यांच्या सदा पाझरे;
ते आम्हीच शरण्य मंगल तुम्हां ज्यापासुनी लाभते !

आम्हांला वगळा—गतप्रभ झणी होतील तारांगणे;
आम्हांला वगळा—विकेल कवडीमोलावरी हे जिणें !

फैजपूर, २९ नोव्हेंबर १९०१



# माधवानुज

## ( काशीनाथ हरि मोडक )

### १ : बर्न्स कवि

वर्षे शंभर जाहली कविवरा ! तूते मरोनी पुरी
देई त्वत्कविता अजूनि हृदया आनंद माझ्या तरी,
कोठे देश तुझा जलापलिकडे भारी दुरी येथुनी
आर्यावर्त कुठे, परंतु उपजे वात्सल्य माझ्या मनी.

दोघे जन्म न पावलो, न बसलो एक्या कुळी वा स्थळी,
नाही भेट, तरी परस्पर मने वात्सल्य ते आकळी,
आहे प्रेम कसे कुठे वसतसे तज्जन्म कोठे असे
नाही आजवरी कधी उकलिले हे गूढ कोणी कसे !

वस्तू दोन परस्परा सतत ज्या तत्त्वामुळे ओढिती
तत्त्वे त्याच रिघे तुझ्या कविवरा ! काव्यांत माझी मती,
जैसा सद्रस पाझरे उकलितां द्राक्षाफळाते करे
वाहे प्रेम तसे तुझे उकलितां सत्काव्य म्यां आतुरे.

प्रेमाने धरुनी करांत अपुल्या शेतामधी नांगर
लीलेने जणु गाइली बहु तुवां काव्ये सदा सुंदर,
साधी नम्र खरी तुला यश परी त्यांही दिले भूवरी
जाईची कुसुमे वनीं विकसली कां वास नोहे तरी ?

शेता नांगरितां हळूच निघतां उंदीर मातींतुनी
केले प्रेमळ काव्य त्यावर तुवां त्याते झणी पाहुनी;

साधा मूषक पावला अमरता संगे तुझ्या तो परी
होतां सज्जनसंग नीच जनही मोठेपणाते वरी

पद्ये पर्णकुटीत राहुनि तुवां आजन्म जी गाइली
लीलेने, असती अहा मज गमे दिव्यत्व ती पावलीं;
त्या पद्यांत दिसे तुझी सुरुचिरा माते सदा आकृति
वर्षे शभर लोटली तुज जरी सोडोनि या भूप्रति

जेथे निर्झर वाहती, विकसती नाना लता सुंदर,
वायू शीतल खेळती, द्विजतती आलापिती सुस्वर,
ऐशा शात निसर्गरम्य विपयी वासा करूनी सदा
काव्ये गाउनि धन्य भूमि अपुली केली तुवां जन्मदा.

साधे प्रेमळ काव्य वाचित तुझे स्वच्छंद होतो घरी
काही सेवुनि रम्य पद्यकुसुमे आनदलो अंतरी,
झाला सौख्यद पूज्य भाव हृदयी उत्पन्न माझ्या अती
केले नम्रपणे तया प्रकट मी शार्दूलविक्रीडिती.

१८९६



## २ : दगड फोडतांना

पटकन् दगडा फुट्ट फुट्ट फूट
किती कुट्ट मी तुज कुट् कूट् ॥ ध्रु० ॥

ही हातोडी हाती धरुनी
माझे सांधे गेले गळुनी
एकसारखी घर्षण पडुनी
गेले तळवे हे सुजुनी.

शक्ति न आतां अंगी उरली
गात्रे सगळी विकल जहाली
तुज येऊं दे आतां करुणा
अन्नदायका जड पाषाणा !

खडिची अठरा जधी घमेलीं
फोडिन तेव्हा मिळणे चवली
पोटापायी दीन दशा ही
हाय ! कपाळी आली पाही.

हा दुर्दैवा दगड फुटेना
फोडाया तो हात उठेना
हे अश्रूंनो वरती पडुनी
टाका दगडा या मृदु करुनी.

अश्रु तरी ते पडतिल कोठुनि !
गाळुनि गाळुनि गेले सरुनी !
हाय कपाळा काय करू मी !
फोडूं कैसा दगड अहा मी !

प्रिय हस्तांनो आतां अंती
करित्ये तुम्हा एक विनंति
स्वीकारा हो काठिण्याला
या दगडाशी झुंजायाला !

बेलापूर, १२ जानेवारी १८९७

## ३ : कृष्णाकोयनांचा संगम

सखे गे, सुरेख संगम किती, कृष्णा मिळली कोयनेप्रति

किती विशाल तट हे अहा !
प्रिय सखे उभी तू रहा
क्षण येथिल शोभा पहा
सखे गे०

बहु चकाकते यावरी
ही सुरेख सिकता, परी
जाय गळुनि धरितां करी
सखे गे०

जगीं असे सुखाचे क्षण
नर झटे धराया पण
जाति तयास ते फसवुन
सखे गे०

झष जली उड्या मारिती
भय न या सुखी हे किती !
भवजली रमूं या रिती
सखे गे०

बघ दोघिंचि मैत्री किती
एकमेकिस आलिंगिती
दोन असून एकाचि होती
सखे गे०

जर अशीच अपुलीं मने
एक होतिल गे प्रीतिने
मग सुखास कुठुनी उणे
सखे गे०

स्थळ पवित्र हे गे जगी
जन बघेल जो लोचनीं
अघ हरेल त्याचे क्षणी
सखे गे०



## ४ : दीपविसर्जन

करी आरती घेउनी आर्यबाला
त्वरे पातल्या नर्मदेच्या तटाला;
करूनी तयानी सरित्पूजनाला
प्रवाही दिली सोडुनी दीपमाला.

अहा काय शोभा वदूं त्या क्षणाची
तृषा शात झाली मदीयेक्षणाची;
तदा अस्तगामी जरी अशुमाली
मना वाटले यामिनी काय झाली.

सरित्पात्र ते स्वच्छ तैसे विशाल
तदा भासले की दुजे अतराल;
तती त्यावरी शोभली दीपिकांची
उदेली जणो पंक्ति की तारकांची.

जशी अंतरिक्षीं फिरे चंद्रकोर
प्रवाही करी रम्य नौकाविहार;
नभी स्वैर संचारती मेघखंड
जली खेळती वीचि तैशा उदंड.

अशी दिव्य शोभा पहाता पहाता
मनी शांत झालो लया जाय चिंता;
झणी सूचली कल्पना एक चित्ता
असे सर्व सृष्टीस जी मूळभूता.

दिले सोडुनी दीप जै बालिकानी
दिला सारिखा वेग सर्वा तयानी,
तयाची स्थिती तत्क्षणी भिन्न झाली
वरी दृश्य कोणी कुणी जाय खाली.

कुणी गुंतुनी राहिले भोवऱ्यांत
जलौघासवे जाय कोणी वहात,
तयातील काही तटा अन्य गेले
पुढे जाउनी अल्प मागेचि आले.

जसे दीप तैसे असंख्यात जीव
प्रभू निर्मितो थोर ज्याचा प्रभाव,
तया सोडुनी देत कालप्रवाही
वहाती तदोघासवे सर्व देही.

कुणी रंक होई कुणी होय राजा
दुजा देखणा हो तिजा हीनतेजा,
कुणी मूर्ख होई कुणी हो शहाणा
कुणी धैर्यशाली तसा भ्याड जाणा.

तसे कां करावे ? असे मी करीन
वृथा वल्गना मानवांच्या अजाण
स्थितीचा असे किंकर प्राणिमात्र
स्थिती त्या करी पात्र किंवा अपात्र.

जरी राहिले नर्मदातीर दूर
जरी आज बाला न दृष्टीसमोर,
स्मरोनी तरी दीपसर्गप्रसंग
झणी हर्षयोगे भरे अंतरंग



## ५ : स्मशानगीत

या क्रूर माझिया हाती
लोटितो तुझ्यावर माती;
दगडाची करुनी छाती
शिशुवरा !

ये चंद्र नभीं उदयाते
स्पर्शितसे तुझिया तनुते;
परि शक्त न उठवूं तूते
प्रियकरा !

हा रम्य वाहतो वारा
बहु हलवी तव कचभारा;
परि उठवी तव न शरीरा
प्रियकरा !

मी येथ गातसें गाना
काढुनिया भेसुर ताना;
परि शके न घालूं प्राणा
प्रियकरा !

लय होतां चैतन्याचा
या चंद्र-मरुद्गानाचा;
उपयोग न होई साचा
प्रियकरा !

हे अश्रु टपाटप खालीं
गळतात शुष्क तव गाली;
याही तुज न्हाऊं घाली
शिशुवरा !

कर जो जो बा अंगाई
चिरकालिक निद्रा घेई;
भय तुजला उरले नाहीं
प्रियकरा !

जातो मी अपुल्या ठायां
यम येइल तेव्हां न्याया,
येईन तुला भेटाया
प्रियकरा !



## ६ : गीतांजलि

हे सान सुमन तूं सत्वर घेईं खुडुनी
जाईल थांबतां मातीमध्ये पडुनी,

जरि मिळे न याते स्थान तुझ्या सुमहारी
निजकरे दुखवुनी देवा या स्वीकारी.

दिन सरुनी न कळत होइल संध्याकाळ
जाईल निघोनी तव पूजेचा वेळ;

सुमनोहर रग न याचा ! हे खरे
वास ये यास बेताचा ! हे खरे
तरि यास मान सेवेचा ! दे त्वरे

जो काल न गेला घेईं त्याते खुडुनी
जाईल थाबतां कोमेजुनि हे पडुनी.



# चंद्रशेखर

( चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे )

## १ : कविवर्य लेंभे

ही येतांच उठोनि कौतुक जणो नेत्रांतुनी पाहतें,
धावोनी अवधान ये लगबगां, कानी उभे राहते,
देण्याला बहुमान मान लवते, उल्हास ये मानसा,
वाटे आज शरत्-प्रभात नटुनी ही येतसे राजसा.

हसाचे गतिचित्र दाविति,–किती नामी पदन्यास हे !
भाषेची सरणी रसज्ञ कविला साधे न अन्यास हे.
ऐशी रम्य विशेषणे विलसतां स्नेहाळ संबोधने,
व्हाया सन्मुख चित्त चुंबकमणी ते कासया शोधणे ?

ह्या पंक्ती मजला हळूच म्हणती अभ्यन्तरी वाहुनी,
वायूच्या झुळुकी सुखावह तुम्हां होतात का याहुनी ?
आम्हीही मृदु आणि कोमल असूं, मंजूळसे गातसूं,
आम्हां सोडुनि त्यांस वानिति कवी येतें तयांचे हंसूं.

सारी सुंदर, सौम्य, गोड रचना देते प्रसादासवे
प्रेमानंद मनी भरोनि, नयनी ही वाहवी आंसवे;
ना गंधर्वपुरांत उंच तळपे होवोनि सौदामिनी,
सत्ता सद्हृदयावरी करितसे, ही भूवरी भामिनी–

–देवी वागतसे जणो, दिसतसे गंभीर राणी जशी,
हीचे दर्शन वाचकांस म्हणजे आहे शिराणी जशी.

ओजाने करुण–प्रधानरस ही जीवंतसा दाखवी,
निर्माता जन जो हिचा निपुण तो आहे कवी हो कवी !

माझा मित्र असो नसो मम तया सप्रेम ही वदने,
तो दीर्घायु असो, सुखात विलसो सन्नंदिनीनदने;
अर्वाचीन कवीत मान मिळवो अग्रेसराचा सदा,
त्याला नित्य असो प्रसन्न कविता कीर्ती तशी सपदा.

सप्टेंबर १९१६



## २ : रंगराव हर्षे

ती तूं, देवी ! प्रगटुनि आता ये हृदयरंजनाते,
सागतसे त्या घेउनि संगे रगेल परिजनांतेः––

बहु गमती तो विनोद, तैसा त्याचा ऋणानुबंधी,
ऐन उमेदीमधिल हंशाही यावा खुशालचदी;

वक्रोक्तीसह ती व्याजोक्ती, व्याजस्तुती असावी,
श्लेष अगोदर की हर्षाला अजब खुमारी यावी;

भुरळी, थापा, आण बरोबर परोपरीच्या कंड्या,
त्यांचा गोंधळ हंसतां हसतां वळविल कीं मुरकुंड्या;

मुरके, लटका, छटा मजेची देतिल आनंदाला,
स्मितेहि यावी, तीं गालांवरि उठविति तरंगमाला;

त्या मालेने उतारवय हे छपले जाइल खास,
चुकेल तेणे रगेलांतुनि होणारा उपहास;

जन चिंतातुर सुरकुतलेले यांच्या आण कुचाळ्या,
ज्यांच्या साधक–बाधक पक्षी कडकड पडतिल टाळ्या,

स्वच्छंदाने अग्रपदावारि कलथ्या खातच येई,
हास्य-रसाला चुटकीसरशी भरती आणुनि देई;

गिरीवरोनी सरिता येतां ज्या स्वैरतेस दावी,
प्रमुखत्वे ती आण, तिच्यांतिल गोडी काय वदावी!

एक मनोरथ विशेष कथितो तोहि तुवां पुरवावा,
निज परिचारकगणात सेवक हा रंगराव घ्यावा,

मग बनुनी त्या स्वतंत्रतेचा साथी तयानुगामी,
स्तुत्य अशा मी यथेष्ट मौजा करोनि राहिन नामीः–

शरदागमनी जे मेघाचे बहुरंग पेहराव,
स्मरण तयांचे घडावयाचे दिसतांच रगराव.

केशाचा तुळतुळित सुगंधी शिरी किरीट फिरंगी,
केव्हा फेटा, पगडी, टोपी, रुमाल कल्पित रंगी;

रंगकुतूहल, बाधायाची ऐट सुरेख रुमाल
बघुनि नटाने खुलुनि म्हणावे केलीस तूं कमाल!

झगा मोगली, कधिं अंगरखा लांब मराठेशाई,
पायघोळसा दाविल केव्हां तो थाट पेशवाई,

वीरश्रीचा पुत्र कनोजा, रजपूत साम्यतेचा,
दिसेल केव्हा निवळ पारसी, सज्जन विलायतेचा.

धोतर अथवा जामा किंवा सुरवार वा विजार,
उपानहें तीं असावयाची जो वेश तदनुसार.

गंध उभे तो केव्हां अडवे कदा बदामी घाटी !
सारी राष्ट्रे टकमक बघती अशी मिशांची धाटी !
" ह्या हर्ष्याचे राष्ट्र कोणते हेच कळे न कुणाला ! "
ध्वनी जनी हा निघतां मानिन मी धन्य आपणाला.

बहु राष्ट्रांचा घडोनि येणे एकांतुनि सहार,
' एकराष्ट्रता ' यांतिल मख्खी हीच खुबी हे सार !

वेषांतिल हे वैचित्र्याचे आहे प्रमेय साधे,
त्याने ममता तैशी प्रियता भिन्न समाजी साधे.

दिसण्यामध्ये विचित्र चित्रे एकाच साखरेची,
तरि सर्वांतुनि साखर, गोडी, सामान्य हे खरेची.

ज्या रंगी, ज्या रुचीत, किंवा ज्या घाटांत भरावे,
त्यासम व्हावे, आदरिले हे जलशील रगरावे.

धार्मिक किंवा सामाजिक वा घटना स्वराजकीय
असो, तियेला हर्षे म्हणजे प्यारा ! जसा स्वकीय.

नगरामध्ये कुणांत होवो कसलाहि सुप्रसग,
रंगराव हा त्यांत नेमका, तो आला की रंग !

भिन्न समाजी प्रिय व्हायाला वेषाहुनी तयाने
विशेष साधन योजियले, जे करिते कार्य जयाने.

मवाळ, त्याचे मित विनयाचे, भाषण सुमधुर, साचें,
नर्म विनोदहि भासति हृदयी बिसतंतु सारसाचे.

नहि केवळ तो प्रिय नगरांताचि, परि त्याचिया समंतीं
ग्रामस्थांसहि पसंत; त्याची करितात तेहि खंती.

ह्या रीतीने नित्य निराळा पोषाक तो करोनी,
भिन्न दिशेला जनास भेटुनि, येवोनियां फिरोनी,
रात्रौ अमुचे रसाल भोजन गोष्टीत व्हावयाचे,
आणि टांगिला बुल्बुल तेथे आम्ही निजावयाचे.

असेल जेव्हां ललितकलेचे रंगावतरण नामी,
रगराव हे जातिल तेव्हां स्वानदाच्या धामी.

अथवा देवी! ठेवियलेले अलगत अचूक तेथे,
कर्णमधुर ती सारंगीची 'कूं कूं' जेथुनि येते.

मंजीराची छुम् छुम झिन् झिन बारीक मंजरीची,
शाहीराला जणु लय सांगे प्रति तार तंबुरीची;

अस्तानी वर सारुनि कोणी ग्यानू झुलोनि राहे,
कड्यावरी निज करलाघव ते सभ्यांस दाविताहे,

रसिकशिरोमणि कवि होनाजी, ते सगन, रामजोशी,
होतिल यांची मधुमय कवने कवणास ती नकोशीं?

वसंतवायूसमान लहरी येति तयांच्या ताज्या,
ब्रह्मकपाटासमान परि तो बंद असे दरवाजा!

रसलुब्धाची मोहाळापरि बाहेर थोप गर्दी,
एकाचीही डाळ शिजेना, आत शिरेना वर्दी;

मग सरसावुनि अस्मादिक हे ठोठावितील दार,
'सरदॉर!' अशा ललकारीचा करितील वाक्प्रहार.

'कोण?' म्हणोनी वाघोबाची डरकी येतां 'हर्षे.'
चुटकीसरसा फटीमधोनी आनंद आंत वर्षे!

यॉंवे !–यॉवे–रंग हय् ! अशा स्वागत घोषामाजी
प्रभावळीमधिं नटीसमोरचि होइल जागा माझी.

ढवळ्या दिवसां दिसावयाच्या ज्या मूर्ति भगलेल्या,
गुलालगोटे फुटुनि इथे त्या असतील रंगलेल्या.

कोणी गंगाजमनी कोणी पिंगट अशा मिशाचे,
कुणि कलपाने कल्पित तरणे, बहुधा गरम खिशांचे;

हे मुरलेले गोड मुरब्बे, गुलकंद रापलेले,
अरविंदांतिल मिलिंद की हे अगदी समरसलेले ?

'सरदॉर !' अशी हाक विनोदे दिली असेल जयाला,
असोनि परिचित न यावयाचा तो ओळखावयाला.

असेल तन्मुख मित्रजनानीं गोजारिले गुलाले,
बलभीमामधिं दिसेल त्याचे रूपान्तरचि जहाले !

आणिल शिष्टागमन हंशाने सुविचित्र रूप जीते,
त्या 'गमती'ची चालू होतिल मग शेलकीच गीते.

वीणा, वेणू, सारंगीच्या मंजूळ सगमाने,
आणि तयाशीं कुशल नटीच्या लयशील सुस्वराने,

अभिनयरंजित रसवंतीच्या रम्य तरंगासगे
झुलुनि रहातिल लोलुप जन ते रंगोनि अंतरंगे.

मग अधिदेवी–कृपाकटाक्षे दौलत वाढुनि काही,
रंग उडाल्यावरती कोणी ह्या गांवचाहि नाहीं.

प्रभात समयी दिसेल जो तो स्वगृही सालस जैसा,
रंगरावही बंगल्यामध्ये पुन्हां निखालस तैसा !

## ३ : गंगाद्वारीं भजन

उलटुनि गेली मध्य-निशाही जीवन-कलह जगीं शमला,
जन निद्रावश गमतो सोऽहं–मत्रे भारियलाच मला,
पान न हाले, शब्द निमाले, स्वानंदी जग मग्न दिसे,
तव भक्तीची ' भग ' पिउनि मज गंगे! भरले स्फूर्ति–पिसे.

भव-भट्टीमधिं तावुनि तावुनि विजनजली जे निववियले,
मत्रघनाने पिटुनि, ओढिले विचार-जत्रातोनि बले,
जे मन नामे काचन त्याची सतार ही रव काय करी,–
" जय् सजीवनि जननि पयोदे श्रीगोदे! भवताप हरी. "

येथ शिवाने जटा फटाफट आपटुनी तुज वाहविली,
गोवधपापे अनुतापाकुल गौतमतनु अवगाहविली,
धन्य महात्मा! आपण तरला, तारियले जग निरतरी.
जय् सजीवनि जननि पयोदे श्रीगोदे! भवताप हरी.

गिरिशिखराहुनि जगदाधारा धारा ही तव अवतरते
छुम छुम झुमझुम जलकलरव हे नादब्रह्मच की नटते?
राहिन हे तव जलधारारव अवधाराया या शिखरीं.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे! भवताप हरी.

विमल विमल! हे कसे तुझे जल, गंगे! गंगाजलाचि जसे.
सुंदर सुंदर! वसुंधरेतिल सुंदरतेचे सार दिसे.
किति सुखशीतल! सत्सगासम आश्रिततनुमन गार करी,
भवजालांतहि बद्ध जनांच्या आणुनि देते मोक्ष करीं.

मधुर मधुर गे! अविकृत केवल दैवी प्रेमचि हे गळते.
वैतरणीच्या उलटाचि याची संतत गति जरि चंचळ ते.

पावन पावन गंगे ! तुजसम तीर्थ–महात्म्य न भूमिवरी.
पुष्कर राजा म्हणवुनि लोकी पूज्य विधी इतुकाच तरी.

जगताच्या इतिहासांतिल हे सत्याचे संशोधन की
कीं सृष्टीतिल पुराण ते हे ? स्मृतिचे हेच निवेदन कीं ?
की हा सगम षडागमांचा ? की निगमाचे सार खरे ?
अनुपम ऐशा आत्मरसाचा हा अवतारचि कां न बरे ?

भूतांवरिचे तव वात्सल्यचि अमृतमिषे हे संभवले,
द्रवले चंद्रकलामृत याताचि शिवचरितामृत कालवले;
त्रिगुणित ऐसे हे परमामृत पाजुनि तृष्णा दूर करी.
जय संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरी.

गिरिकंदरिं हा गंगाद्वारीं तव तीर्थाचा निधि जमला,
सन्निध ह्याच्या येतां भासे झाला चदनलेप मला,
कर्पूरांजन ! नयन निवाले, सात्त्विक धारा अवतरती,
ह्या तव ममता–सुधाकरे जणु चद्रमणी हे पाझरती.

थंडावुनि ह्या थंडाईने हाव भवाची उपशमली,
शुष्क सुखांची मृगतृष्णा ही राल–ज्वालेसम शमली;
शांत मनाला प्रसन्नता ये गगे ! या तव जलापरी,
स्वानंदाच्या ठुमकति त्यावरि मनोज्ञ मंजुलशा लहरी !

स्फटिक–शिलेच्या मंचावरती कोमल किसलय–सुमशयनी,
भूरंभेच्या परिरंभामधिं, धवल वसंतांतिल रजनी
अनुभविणाऱ्या अरे नरेंद्रा ! विगलित कां तू हिरमुसला ?
ही सुखशांती न हि विषयान्ती असतो विरसाचि ठेवियला.

सकल मलांचे भंजन की हे ? विकल मनांचे रंजन कीं ?
विषयांधांचे अंजन की हें ? ज्ञानमधूच निरंजन की ?
कीं संजीवन वैराग्याचे, शांतरसामृत खरोखरी !
ह्याचा एकहि कण प्याल्यावरि चर्चा मम यम काय करी ?

हे मुक्तीचे केलिसरोवर, यांतुनि हो रममाण मना !
जगदात्म्याचे निर्मल बिंबचि तूं प्रतिबिंब सजे सुजना !
परम सुखाचा डोह शरीरा ! मार बुडी तूं स्नान करी.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं.

ध्यानहि जरि तव पावन करिते, स्नान तरी वद काय करी ?
स्नान, पान, गुणगानहि केले, देशिल फल मग काय तरी !
अधिकाचे फल अधिकचि म्हणती, पण ते माझ्या ठेव करीं.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं.

जन्मुनि तीरीं, पिउनि तुझे पय, न करिति तव गुणगौरव हा,
अधमपणास्तव चुकेल कां गे सांग मला तरि रौरव ? हा !
तव गुण गातां रमवुनि यमही झुलविन शब्दब्रह्म करी,
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भव ताप हरीं.

शब्दब्रह्मीं जो कवि कसला, त्याला रौरव मग कसला ?
नित्यानंदे पूर्ण विकसला, परं ब्रह्मपदिं तो वसला.
परंब्रह्मपदिं तुझ्या झऱ्यामधिं समरसला तो दुधापरी,
'पुनरपि जननं पुनरपि मरणं' यांची ओळख तो न धरी.



## ४ : कारंजें

हे अवलोकुनि कारंजे
गा हृदया रसिका रंजे ॥ ध्रु० ॥

रविप्रकाशा-माझारी
याचे तेजोमय वारी
चमके, मुकेच गगनाचे
ध्याया थैथै जणु नाचे,

पडुनि चंद्रिका यास करी
धवल हिमाद्रीनि नवलपरी,
विलसति किति ह्या जलधारा
शुद्ध रुप्याच्या जणुं तारा.

ह्या बिंदूचे तो होती
गोल अमोल विमल मोती.
हंसोत अथवा जवाहिरे
मी तो म्हणतो यास हिरे !

होतां जल पवनाकुल ते
फूलचि जणुं डुलते झुलते.
न दिसो तमात तारानी
उमगे मंजु तुषारांनी.

सततोत्साहे, आनदे,
उडते पडते निज छंदे,
पडुनहि उंच उडायाला
याला श्रम न कदा झाला.

सुदिन-दुर्दिनीं उल्हासे
हासे सम सुंदर भासे,
खालीं वरती सतत गती,
गती विराम तया मग ती.

शील करी जे तद्घटना,
ना ते शक्यचि आकलना;
शाश्वत अशाश्वती ज्याला,
तीच शाश्वती मग त्याला.

स्पृहावंत जरि निरंतरी
तरीहि निस्पृह निरंतरी
तमें तमोमय हे असते,
तेजे तेजोमय दिसते.

अभिनव, सतत, जरी लहरी,
उन्नत, चिंताजाल हरी,
गुणगुणुनी गुणगण हे तूं
तूंहि असे हो हा हेतू .

१९१०

--- - ---

# विनायक

( विनायक जनार्दन करंदीकर )

## १ : हतभागिनी

तळहाती टेकुनी ही स्वशिराते बैसली ! ध्रु०

मस्तकी केश विखुरले,
श्वास चालले, अश्रु लोटले,
गळे जल गाली–चिंतेने पोळली !

वस्त्रे ती अपुरी जुनी,
तेथ कोठुनी, असावा मणी,
दीनता ल्याली–दु:खाने कावली !

दारिद्य्र, घरी जागते,
अन्न काय ते, दिसेना कुठे,
वायुजलवाली–गगनाची साउली.

होती ती सिंहासनी,
भाग्यशालिनी, धनी विजयिनी,
परी तिज खाली–दुर्दैवे ओढिली.

एकाश्रुबिंदुकारणे,
तियेच्या रणे, झुंजले मने,
असे सुत व्याली–जयकाली माउली.

कारटी करंटी तिथे,
निपजली भुते ! मातृशोणिते—
स्वतांला लाली–आणाया धावली !

कल्याण काय नेणती,
नित्य भाडती, आपसांत तीं,
परां वश झाली–स्वत्वाला विसरलीं!

गेले दिन यावे कसे,
वर्तने असे, एकदां फसे—
गाय जी गाळीं–चेपत ती चालली!



## २ : विरही

वदवेना मला लागे हुरहुर जी तुजमुळे! ध्रु०

चालतो बोलतो घरी
हासतो वरी, अंतरीं परी
अश्रु वेल्हाळे! विरहाने तव गळे.

तव सहवासी जे दिन
वाटले क्षण, ते युगाहुन
दीर्घतर झाले. नवल असे वर्तले!

नाहीस रूपशालिनी
परी गुणखनी, प्रेमरूपिणी
गुणे प्रिय झाले–रूप तुझे सांवळे.

तव अकपट प्रेमळ हंसे
अंतरी ठसे, बोल गोडसे
श्रुतीची पाळे, होउनियां बैसले.

तव हालचाल लाडकी
आठवुनि सखी, एकसारखी
जड क्षण झाले. कठितसे प्रेमळे !

होईल कधी दर्शन
दृढालिंगन, प्रेमचुंबन
चिंतनी दोले—मन घेऊ लागले.

अलि असतो तर बैसुनी
वायुवाहनी, गात येउनी
तुला वनमाळे ! असते मी चुंबिले.

परि दुबळी मानवकुडी
व्यर्थ बापडी, तियेची उडी
बेत केलेले, सर्व कुणा साधले ?



## ३ : सोंगटीचा खेळ

खेळ मांडिला जगन्नायके जगत्पटाच्यावरी.
मानव नरदा, दिवसयामिनी फासे धरिले करीं.

भिन्नत्वास्तव रंग चढविला हिरवा पिवळा वरी !
रंगाखाली साऱ्या नरदा शुष्क लांकडे परी !

या भिन्नत्वी भरली जादू—तिचे नांव संसृती.
भिन्नत्वबळे दिसे चालली जगताची राहटी.

हिरवीमागे पिवळी लागे लाल बैसली कटी.
घरात राहे पडून काळी, तिची खुटली गती.

पडेल जैसा डाव त्यापरी पटीं सोगटी फिरे
अभिमानमदें गिळित चालली लाल घरेच्या घरे
पिवळीचा बैसला तडाका, हिरवी पिकली मरे
नशीब फुटके म्हणून काळी मनीं बिचारी झुरे !
मारील कुणी, मरेल कोणी, मागे, कोणी पुढें
न्याय जगाचा जो चढतो, तो यथावकाशें पडे
परम पदाचा लाभ सुदुर्घट एकादीसच घडे
पदाजवळ पोचली सोगटी, फांसा चुकतां बुडे.
तिच्या ललाटीं, पुनः फिरावीं पटीं घरे तींच तीं
चर्वितचर्वण केल्यावेगळ तिला न दुसरी गती.
स्वबले तरल्या दुसऱ्या नरदा तिज द्याया सद्गती
चौऱ्याशींचा चुकला फेरा पुनः क्रमूं लागती.
स्वतां खेळतां खेळविणारा प्रभू जगाचा पती.
निमित्त नरदा यदृच्छाबळे खेळ मात्र खेळती;
परि म्हणती निर्जीव लांकडे ‘ माझी माझी ’ कृती
धन्यास भुलली, स्वतांस नुसत्या दोषांनी लिंपिती.



## ४ : प्रोफेसर छत्र्यांचा केसरी

तुज वनराजा काय ग्रहदशा आली । परवशता प्राप्त जहाली
तूं विपिनाचा सार्वभौम अधिकारी । मृगकुलें प्रजा तव सारी
तव आज्ञाही वेदवाक्य कांतारीं । तूं राजा थोर विचारी
गर्जना तुझी धैर्या कांपविणारी । चपलेची दृष्टि भरारी

मदभरे नाग जो नाचे
मस्तकी चढून तयाचे
भक्षिसी कवळ मोत्याचे
ऐश्वर्य असे असे तुझे जयकाली । परि आले काय कपाळी !

दुर्दैव तुझे पडलास कसा आतां । कपट्यांच्या निर्दय हातां
ते थाटाने मिरवितात, तव माथा । हाणिती तडातड लाथा
तूं दुबळ्यांच्या साहसी प्रतोदाघाता । भीसी श्वासा दक्पाता
नि:शकपणे नरनारी
करितात तुझ्यावर स्वारी
ये अशी तुला लाचारी
तव कर्णाची निर्भय धरुनी पाळी । लववितो तुज मुलीबाळी !

स्थिति रुचे कशी तुज ही लाजिरवाणी । कोठे तव दडले पाणी ?
जीवतपर्णी स्वत्वाची होतां हानी । प्रेतकळा पावे प्राणी
मृदुलता अशी धरिता लोण्यावाणी । खातील तुला ओठानी
समज हे मानवी कावे
कुरवाळित घेति चावे
मृगजलास या न फसावे
ही इष्ट नव्हे परवशतेत बहाली । नाच रग दीस महाली !



## ५ : गणेशपूजा

रोगे पीडित नगरें नसती योग्य वसायाला
म्हणुनि बाधिले पुण्याश्रम, निर्मला पर्णशाला. ध्रु०

गणरायाची मूर्ति मंगला स्थापूं त्या स्थानीं
नेत्रावाटे खळखळ वाहे दुःखाने पाणी
विघ्नहराते प्रेमे न्हाणूं त्याच आंसवानी
वाहू पट जो कर बसल्याने जीर्ण असे झाला.

अशा प्रसंगी तिलक लाधणे महत्प्रयासाचे
दिसो दिसेल सुने त्यावेगळ भाळ गणेशाचे
पुष्प एक वाहून टाकिले आहे चांफ्याचे
दुसरे मिळवावयास जाऊ—करूं उद्यमाला.

कामाधकरी पडती, रडती युवती दिनरात
दीर्घ उसासे त्यांचे येथे धूप-तुल्य होत
सर्वग्रासी दिसे पेटली परसत्ता-ज्योत
तिनेच ओवाळूं देवाला, करू मंगलाला.

सार वस्तुंचा लोट सारखा परदेशी जाता
नैवेद्यास्तव कांहीं नुरले, काय करू आता ?
किती आळवू, गाऊ, ध्याऊ तुम्हा दीननाथा
रचिले, रचितो अपराधाचे शत पोटी घाला.



## ६ : चिमा

भाग्याचे समयी मजा उडविली मत्संगतीने जिने;
माते जी न विसंबिली भटकतां पोटार्थ राने वने,
ऐश्वर्यी व्यसनी अशी मजसवे जी नांदली सारखी,
हा ! हा ! हारवली चिमा प्रियतमा माझी जिवाची सखी !

खाली मान करून सतत उभी लज्जावती जी असे,
रागेजे न कधी; सदा मजकडे पाहून गाली हंसे !
नाही सोडुन कोपरा सरकली, माझे सदा आयकी,
हा ! हा ! हारवली चिमा प्रियतमा माझी जिवाची सखी !

नाही माहित डामडौल अगदी साधीसुधी वागली,
नेसायास दिले जुने चिर तरी नाही असतोषली,
ल्याली भूषण एकही न, रिझली सेवून पाने सुकी,
हा ! हा ! हारवली चिमा प्रियतमा माझी जिवाची सखी !

नाही चारजणासमक्ष तिजला मी चुंबितां लाजली,
हूं की चू न करी उभी तिज जरी मी विस्तवे भाजली,
ऐशी भक्ति असे तिची मजवरी ठेवी मला जी सुखी,
हा ! हा ! हारवली चिमा प्रियतमा माझी जिवाची सखी !



# बी

## ( नारायण मुरलीधर गुप्ते )

### १ : दीपज्योतीस—

सोन्याची तनु जाळितेस अपुली पाषाणमूर्तीपुढें,
मुग्धे ! ते वद कोण पुण्य तुझिया हातास तेणें चढे ?
सारे विश्व बुडे तमात तिकडे भांबावुनी बापुडे,
गे ! निष्कंप, तुला परंतु इकडे, ही ध्यानमुद्रा जडे.

ध्याया कोंडुनि मंदिरात जगदुद्यानी न तू जन्मली,
वाया नासुनि जावया नुगवली बागेत चाफेकळी !
व्हाव्या वर्धित वस्तु ज्यात वसते सौंदर्य अत्युत्कट,
इच्छा केवळ कीं ! न वस्तुसह ते पावो जगीं शेवट.

प्रत्यंगी अवध्या प्रकर्षभर ये ज्यांच्या पुरा मोडुन
त्यांच्या पूर्णपणास सुस्थिरपणा येथे न अर्धक्षण,
पूर्णोत्थापनकाल तोच पतनप्रारंभही होतसे,
ऐसा निष्ठुर कायदा सकल या सृष्टीस शासीतसे !

येथे नूतनजीर्ण, रूप अथवा विद्रूप, नीचोत्तम,
न्यायान्याय, अनीतिनीति, विषयी संभोग का संयम;
जातीं ही भरडोनि एक घरटी, एकत्र आक्रंदत,
आशा भीतिवशा म्हणूनिच मृषा स्वर्ग स्रजी शाश्वत.

हें वैषम्य असह्य ' होतसमयी ' स्थापावया साम्यता,
तेजोव्रत यदा यदा त्यजुनि ती प्रेतोपमा स्तब्धता,

अन्यायप्रतिकारकार्य करिती नाना प्रकारान्तरे,
दारी बंड! घरांत बंड! अवघे ब्रह्माड बडे भरे!

हे लोकोत्तर रूप तेज तुजला आहे निसर्गे दिले,
कीं तू अन्य तशीच निर्मुनि जगा द्यावीस कांही फले;
दाने दे न कुणा निसर्ग! धन तो व्याजे तुम्हां देतसे,
ते त्याचे ऋण टाक फेडुनि गडे! राजीखुशीने कसे!

होतां वेळ रसप्रसन्न फुटुनी येतो फुलोरा तिला,
ती आत्मप्रतिमांस निर्मुनि हसे संहारकालानला,
'वाढा आाणे जगा' निसर्ग म्हणतो सृष्टीस भूतात्मिका,
डोळ्यानी उघड्या पहात असतां होशी गुन्हेगार कां?



## २ : चांफा

चांफा बोलेना, चांफा चालेना,
चाफा खत करी कांही केल्या फुलेना. ध्रु.

गेले 'अंब्याच्या' बनी
म्हटली मैनांसवे गाणी
आम्ही गळ्यांत गळे मिळवुन.

गेले केतकीच्या बनी
गध दर्वळला वनीं
नागासवे गळाले देहभान.

आले माळ सारा हिंडुन
हुंबर पशूंसवे घालुन
कोलाहलाने गलबले रान.

कडा धिप्पाड वेढी
घाली उड्यांवर उडी
नदी गर्जुन करी विहरण.

मेघ धरूं धावे
वीज चटकन लवे
गडगडाट करी दारुण.

लागुन कळिकेच्या अगा
वायु घाली धांगडधिंगा
विसरुनी जगाचे जगपण.

सृष्टि सांगे खुणा
आम्हा मुखस्तंभ राणा
मुळी आवडेना ! रे आवडेना ! !

चल ये रे ये रे गड्या !
नाचु उडु घालु फुगड्या
खेळु झिम्मा झिम्-पोरी झिम्-पोरी झिम् !

हे विश्वाचे आंगण
आम्हा दिले आहे आंदण
उणे करू आपण दोघेजण.

जन विषयाचे किडे
यांची धाव बाह्याकडे
आपण करू शुद्ध रसपान.

'दिठीं दीठ' जातां मिळुन
गात्रें गेली पांगळुन
अंगी रोमांच आले थरथरून.

चांफा फुली आला फुलुन
तेजी दिशा गेल्या आटुन
कोण मी–चांफा? कोठे दोघेजण?



## ३ : तीव्र जाणीव

"आम्ही आद्यजगास चालन दिले अध्यात्मतेजोबळे!
"काळाच्या उदरांत खोल अमुची आहेत गेली मुळे!
"द्याया पावनता, उदार समता, सत्प्रेरणा मानवा,
"आहे भारतसंस्कृति क्षम सदा ती आर्यकुक्ष्युद्भवा!"

जन्माने अधिकारजाति ठरते, जन्मेचि, नीचोत्तम,
वज्राभेद्य समाजधोरण असे झाले जिथे कायम,
तेथे शुद्ध समाजनीति, समता, सत्प्रेरणा नांदती,
आढ्योक्तिप्रति ह्या मृषा करितसे प्रत्यक्ष सद्य:स्थिति!

कां 'अब्राह्मणवाद' नित्य अमुच्या मार्गीं पडे आडवा?
याचा सारविचारबोध अझुनी आम्हां नको का हवा?
नाना धर्मविमोह निर्मुनि जनां केले निसर्गच्युत,
ती कालोपहता समाजघटना कामा न ये साम्प्रत!

येती भारतभूपटावरि नवे ताज्या दमाचे गडी,
त्यांचे डाव अचाट, जोम जबरा, ईर्षा महा धांगडी!

निर्माया प्रतितोड त्यांस अमुचे सामर्थ्य सर्वस्व जे
ते एकीकृत या विशेष विषमी केले तरी पाहिजे.

आपोआप घडेल इष्ट समयी ते कार्य, हे बोलणे
आहे भ्रामक ! युक्त काय सगळे काळावरी टाकणे ?
भागीदार कृतीत मानव असे कालानिसर्गासवें,
आणा त्यास समीप एकवटुनी यत्नप्रयत्नोत्सवे.

भावी भारतभाग्यसूचक महाचिह्ने दिसो लागती,
तो तो तीव्र समाजशुद्धिकरितां जाणीव होते अती,
ठेवूं कृत्रिम भेद कायम, कुणा अस्पृश्य मानू जरी,
स्वातंत्र्यास अपात्र आपण ठरूं, घेऊनि शापा शिरीं !

दास्यत्वांत विलीन अज्ञभगिनी देखोनि ही आपदा,
होते रक्त न तीव्र तप्त तुमचे आर्यांगनांनो ! यदा,
बोला ! नूतन भारतीं नवजगद्भद्रार्थ वीरांप्रति
निर्मायास समर्थ काय तुमची निःसत्त्व कुक्षिस्थिति ?

ते स्वातंत्र्य खरे न, फक्त अपुली जे तोडिते बंधने,
अन्याच्या पदशृंखलांस बघते निष्कंप ऐशा मने,
या त्या आपण वागवू निजपदी त्याच्यासवे प्रत्यहीं,
तोडू त्यास समग्र एक करुनी आकाशपाताळही !

ते आहेत गुलाम ! दूर करिती जे रंजले गांजले !
ते आहेत गुलाम ! जे निजजनद्रोही सदा रातले !
ते आहेत गुलाम ! जे कचरती सोसावया साकडी,
तैशा शापशिव्याहि सत्यकथनी प्रीतीचिया आवडी !

## ४ : काव्यानंद

दैत्यांनो ! न समुद्रमथन, वृथा येथे बळाची कथा
येथे वायुसुता ! हतप्रभ तुझी उड्डाणदर्पप्रथा.
होते अक्षमवेग यद्यपि जगच्चक्षो ! तुझे दर्शन
वाया केवळ वादपाटव न हे वाचस्पते ! वाग्रण.

येथे अद्‌भुतरम्य नित्य पडले स्फूर्तिप्रभेचे कडे,
अम्लान प्रतिभा-कळ्या उमलल्या आहेत चोहीकडे.
वोसंडे दुथडी भरूनि सरिता सत्कल्पना पावन
वृत्तीची रसलीन चंचळ खगश्रेणी करी क्रीडन.

सारीही जड इंद्रिये न शकती येथे प्रवेशावया
बुद्धिग्राह्य न वाव त्यास, न कळे ठाव प्रमाणत्रया.
वृत्त्यन्तर्गत टाकणे कठिणता, तद्रूपता पावणे,
काव्यानंदरसप्रसंग मग हा निस्संग संभोगणे !



## ५ : पिकलें पान

पद्य मजला येईल करू जाता,
त्यात ओतू मी काव्य कसे आता ?
अंगि नुरता निर्माणशक्ति लेश
कसा यावा भर काव्यकौमुदीस ?

स्फूर्तिशक्तीचा होय लुप्त ' मंत्र '
तिथे झाले विकलांग वहन ' यंत्र '
' तंत्र ' विस्मरलो, होय मी उदास!
कसा यावा भर काव्यकौमुदीस?

एक नैसर्गिक जन्म सर्वमान्य,
अन्य होतो संस्कारकर्मजन्य.
छटा याच्या होता न एकजीव
काव्यसौंदर्यी भासते उणीव!



# तांबे

( भास्कर रामचद्र तांबे )

## १ : कुणि कोडें माझें उकलिल का ?

कुणि कोडे माझे उकलिल का ?
कुणि शास्त्री रहस्य कळविल का ?        ध्रु०

हृदयिं तुझ्या सखि, दीप पाजळे,
प्रभा मुखावरि माझ्या उजळे,
नव रत्ने तूं तुज भूषविले,
मन्मन खुलले आतिल का ?

गुलाब माझ्या हृदयी फुलला,
रंग तुझ्या गालावर खुलला,
काटा माझ्या पायी रुतला,
शूल तुझ्या उरिं कोमल का ?

माझ्या शिरिं ढग निळा डंवरला,
तुझ्या नयनि पाउस खळखळला;
शरच्चद्र या हृदयिं उगवला,
प्रभा तुझ्या उरिं शीतल का ?

मद्याचा मी प्यालो प्याला,
प्रिये, तयाचा मद तुज आला;
कुणी जखडिले दोन जिवाला
मन्त्रबधनी केवळ ? का ?

प्रतापगढ, ता. ५ सप्टेंबर १९२०



## २ : घट भरे प्रवाहीं बुडबुडुनी

घट भरे प्रवाही बुडबुडुनी--
न दिसे तुज का न पडे श्रवणीं ? ध्रु०

पदर गळाला, उडे वायुवर,
कुरळे उडती केसहि भुरभुर,
प्रमदे, बघ त्यां सांवर, आवर-
का उभी प्रवाहीं शून्य मनी ?

स्वैर गार या झुळ्का वाहति,
मातीचा ये वास सभोवति,
क्षितिजी बघ ढग वरवर चढती,
बघ घरा निघाल्या सोबतिणी.

सळ डोळ्यांवर, काय पाहशी ?
कान देउनी काय ऐकशी ?

अचंचल उभी व्याकुळ दिसशी—
कां उचलिल घट येवोनि कुणी ?

पाउल नच ते, शेत सळसळे;
शब्द न मानवि, तारा बोले;
शीळ न, वायुच वशी खेळे,
का विरघळशी भ्रमिं फिरफिरुनी ?

कवळुनि पद जल थरारुनि हले;
स्पर्शुनि शरिरा वारा बरळे,
वेलि हसति तुज फुलुनि बघ फुले,
डोलती विनोदे तरु बवुनी !

प्रतापगढ १४ सप्टेंबर १९२०

## ३ : घन तमीं शुक्र बघ राज्य करी !

घन तमी शुक्र बघ राज्य करी,
रे खिन्न मना, बघ जरा तरी ! ध्रु०

ये बाहेरी अडे फोडुनि
शुद्ध मोकळ्या वातावरणी,
का गुदमरशी आंतच कुढुनी ?
रे ! मार भरारी जरा वरी.

प्रसवे अवस सुवर्णा अरुणा,
उषा प्रसवते अनंत किरणा,
पहा कशी ही वाहे करुणा
कां बागुल तू रचितोस घरी ?

फूल हंसे काट्यात बघ कसे,
काळ्या ढगिं बघ तेज रसरसे,
तीव्र हिमातुनि वसतहि हसे,
रे, उघड नयन, कळ पळे दुरी.

फूल गळे, फळ गोड जाहले,
बीज नुरे, डौलात तरु डुले,
तेल जळे, बघ ज्योत पाजळे,
का मरणि अमरता ही न खरी ?

मना, वृथा का भीशी मरणा
दार सुखाचे ते हरि करुणा !
आई पाही वाट रे मना,
पसरोनि बाहु कवळण्या उरी.

इंदूर, ता. २९ ऑक्टोबर १९२०



## ४ : मरणांत खरोखर जग जगतें !

मरणांत खरोखर जग जगते,
अधि मरण, अमरपण ये मग ते. ध्रु०

अनंत मरणे अधी मरावी,
स्वातंत्र्याची आस धरावी,
मारिल मरणाचि मरणा भावी,
मग चिरजीवपण ये बघ ते.

सर्वस्वाचे दान अधी करिं,
सर्वस्वच ये स्वये तुझ्या घरिं,
सर्वस्वाचा यज्ञ करी तरि
रे ! स्वये सैल बधन पडते.

स्वातंत्र्याचा एकचि ठावा
केवळ यज्ञचि मजला ठावा;
यज्ञ मार्ग ! हो यज्ञ विसावा !
का यज्ञाविण काहीं मिळते ?

सीता सति यज्ञी दे निज बळि,
उजळुनि ये सोन्याची पुतळी,
बळी देउनी बळी हो बळी,
यज्ञेच पुढे पाउल बढते.

यर्हि अहर्निश रवि धगधगतो,
स्वसत्त्वदाने पाश छेदितो,
ज्योतिर्गण नव जन्मुनि जगतो,
रे स्वभाव हा ! उलटे भलते.

प्रकृति-गती ही मनिं उमजुनिया
उठा वीर, कार्पण्य त्यजुनिया;
' जय हर ! ' गर्जा मातेस्तव या !
बडबडुनी काही का मिळते ?



## ५ : जेव्हां लोचन हे

जेव्हा लोचन हे तुझे विहरती या माझिया लोचनी
तेव्हां ज्योति झळाळते जिवलगे, सौदर्यसीमाच ती !
वर्णाया तरि वर्ण आणु कुठुनी ? कुठेच माझी मती,
राही मूक उभा, गती नच अता वाचाळतेलागुनी.

कैशी मी लपवूं, कुठे छिपवु ही रम्याकृतीची खनी ?
हे माझे पडके भिकार घरटे, या चोरही घेरिती,
ठेवूं मी हृदयातरी तरि तया काटे अतां व्यापिती,
कोठे ठेवु तरी सुरक्षित हिला काळाचियापासुनी !

वाणीचे बनवीन मदिर तरी सौभाग्य ते कोठुनी ?
जे लाभे कविला तया यम जया कांपे सदा निर्दय.
रंगी रंगुनि जो रची सुकवितामंजूषिका-वाङ्मय
त्याला ये लपवावया निजसखी, आशा वृथा मन्मनी !

आतां दीनदयाघना, चरणिं रे ही एकचि प्रार्थना,
नेतां पुण्यमयी प्रिया तिजसवे ने पातकी या जना.



## ६ : साम्राज्यवादी

फस्त करी भक्षुनिया सर्व धान्यराशि हा,
हडुकास्तव वसवस ये, झुंजे इतरांशिं हा. ध्रु०

त्रिभुवनही या न पुरे, खादाडचि हा गिधाड,
कळवळतो वखवखला बापुडा उपाशि हा.

गिळि अपुले, गिळि परके; खांच ती तरी भरे न,
शातीच्या वर बाता, बोबले अधाशि हा.

परमुलुखा जाळि, पोळि; लाखाचे खून करी,
न्यायाचा वर तोरा, चोर चढवि फाशिं हा.

शास्त्रतटीं तोफ घोर फडशा करि बंधूंचा!
विश्वबधुता खरि ही रक्षी दुबळ्याशि हा!

मार्तित राबोनि गरिब धान्याचे रचिति ढीग,
भक्षुनि रक्षक निरिच्छ बोका सन्यासि हा!

धन्य तुझी धर्मात्म्या! पसरे हा जगड्व्याळ!
चिरडी हा पायिं दीन, उन्नति करि खाशि हा!



## ७ : रिकामे मधुघट

मधु मागशि माझ्या सख्या, परी
मधुघटचि रिकामे पडति घरी ! ध्रु०

आजवरी कमळाच्या द्रोणीं
मधू पाजिला तुला भरोनी,
सेवा ही पूर्विची स्मरोनी,
करिं रोष न सखया, दया करी.

नैवेद्याची एकच वाटी
अतां दुधाची माझ्या गांठी;
देवपुजेस्तव ही कोरांटी
बाळगीं अंगणी कशी तरी.

तरुण-तरुणिंची सलज्ज कुजबुज,
वृक्षझऱ्याचे गूढ मधुर गुज,
संसाराचे मर्म हवे तुज,
मधु पिळण्या परि रे बळ न करी !

ढळला रे ढळला दिन सखया !
संध्याछाया भिवविति हृदया,
अतां मधूचे नांव कासया ?
लागले नेत्र रे पैलतिरी.



## ८ : वाटेच्या वाटसरा

या, या हो, या हो रसिका, येथे लपा,
जो शब्द बाळपणिं गेला त्याचा हा तोटानफा.

ती काय बोलते ऐका चोरुनि जरा,
त्या तिऱ्हाईत पाथस्था जो आला तीच्या घरा.

“जिवाचे लागेबाधे ठाव नाही सख्या भावा,
वाटेच्या मुशाफिरा, जाई जाई दुज्या गांवा.

जन्मोजन्मीच ते तळा गेलं आतां पाप,
गुहेच्या अंधारात लोपलं रे आपोआप.

चाळ्वोनी आता ओढिशी का वरवर ?
वाटेच्या वाटसरा, दृष्ट जादूची आवर.

बिळांत झोपे नाग, नको घालूं रे फुकर,
चाळ्वून त्याला नको ओढूं वरवर.

असावधपणी शब्द गेला कधी काळी,
भरल्या संसारांत नको फोडूं रे किंकाळी !

झालं गेल आता नाहीं त्याचा मागमूस,
माझे आई गंगे, कां रे उकरिशी कूस ?

सांज झाली तरी जाई जाई दुज्या गांवा,
वाटेच्या वाटसरा, नको साधूं पुरा दावा.

कालवूं विष नको भरलेल्या आता ताटी,
झालं गेलं त्याची कशासाठीं आटाआटी ?

जन्मजन्मींच्या रे तुझ्या ऋणानुबंधाची
गोष्ट लांब गेली, वाट पुढील जन्माची.

पुढील जन्मीं आता तुझा हिशेब करीन,
गहाण जीव माझा, मी या जन्मी पराधीन.

लष्कर–ग्वाल्हेर ता. २८ फेब्रुवारी १९३५



# दत्त

( दत्तात्रेय कोंडो घाटे )

## १ : आगगाडीस

नेइं मला लवकरी
झाला उशिर किती हा तरी ध्रु०

मानस माझे स्वेच्छाचारि,
मला सोडुनी तव स्कंधावरि,
जाउन बसले केव्हांचें घरिं;
जड काया ही परी,
तरी तूं नेइं तिला सत्वरी.

पवनचपल जन तुजला म्हणती,
मग कां धरिशी ही मंद गती ?
ऐकुन माझी दीन विनती,
द्रव तुझिया अंतरीं,
आला नाहीं ना तिळभरी ?

जों जो जवळ घराच्या जातो,
तो तो अधिक उताविळ होतों,
तव निर्जिवपण विसरुनि म्हणतों
वेड्यावेड्यापरी,
बाई नेइं मला झडकरी.



## २ : निज नीज माझ्या बाळा !

बा नीज गडे नीज गडे लडिवाळा !
निज नीज माझ्या बाळा ध्रु०

रवि गेला रे सोडुनि आकाशाला,
धन जैसे दुर्भाग्याला.
अधार वसे चोहिंकडे गगनांत,
गरिबाच्या जेवि मनात.
बघ थकुनि कसा निजला हा इहलोक;
मम आशा जेविं अनेक.
खडबड हे उंदिर करिती,
कण शोधायाते फिरती,
परि अती निराश होती,
लवकरि हेही सोडितील सदनाला,
गणगोत जसे अपणांला.

बहुदिवसांच्या जुन्या कुडाच्या भिंती,
कुजुनी त्या भोके पडतीं,
त्यामधुनी त्या दाखविती जगताला,
दारिद्र्य आपुले बाळा.
हे वळ्कीचे जीर्ण मोडके दार,
कर कर कर वाजे फार,
हे दुःखानें कण्हुनी कथी लोकाला
दारिद्र्य आपुले बाळा.

वाहतो फटीतुनि वारा,
सुकवीतो अश्रूधारा,
तुज नीज म्हणे सुकुमारा !
हा सूर धरी माझ्या या गीताला
निज नीज माझ्या बाळा !

जोवरती हे जीर्ण झोपडे अपुले
दैवाने नाही पडले,
तोवरतीं तू झोप घेत जा बाळा,
काळजी पुढे देवाला !
जोवरती या कुडींत राहिल प्राण,
तोवरि तुज सगोपीन,
तदनंतरची करू नको तू चिंता
नारायण तुजला त्राता.
दारिद्र्या चोरिल कोण ?
आकाशा पाडिल कोण ?
दिग्वसना फाडिल कोण ?
त्रैलोक्यपती आतां त्राता तुजला,
निज नीज माझ्या बाळा !

तुज जन्म दिला सार्थक नाहीं केले;
तुज कांहिं न मी ठेवीले
तुज कोणि नसे छाया तुज आकाश;
धन दारिद्र्याची रास;
या दाहि दिशा वस्त्र तुला सुकुमारा;
गृह निर्जन रानीं थारा;

तुज ज्ञान नसे अज्ञानाविण काही,
भिक्षेविण धंदा नाही.
तरि सोडु नको सत्याला,
धन अक्षय तेच जीवाला,
भावे भज दीनदयाळा,
मग रक्षिल तो करुणासागर तुजला,
निज नीज माझ्या बाळा !



## ३ : दीपका !

स्नेहाने जळशी, तयासह दिव्या ! तू राहसी अक्षय;
स्नेहावांचुन जीवही न धरिसी ऐसा तुझा निश्चय.
स्नेहाचा लवही मिळे न मजला, प्राणास कटाळलो,
स्नेहावाचुन कोरडाच जळतो–हे काय मी बोललो ?

कानी हे पडतांच काय तुजला वाटेल आई बरे ?
वेड्याचे वच मानशील सखये ! कैसे बरे तू खरे ?
मित्रा ! तूं म्हणशील खास बनला वेडा तुझा सोबती,
बोला–कांहिं म्हणा वदून चुकलो आता न त्याची क्षिती !



## ४ : स्वतंत्रतेस—

बांधी ज्यास न शृंखला, न कधिं जे कोणा उगा भीतसे,
ऐसे मानस मात्र मंदिर तुझें स्वातंत्र्यदेवी ! असे,
जेथे नित्य घनांधकार असतो कारागृहीं त्या सदा
तत्तेजस्तरणी प्रकाश करुनी त्याची हरी आपदा.

जो जो चंदन घाशिती अधिक दे तो तो सुगंधाप्रती,
जो जो कांचन तावती अधिक ते तो तो झळाळे अती;
जों जो रत्न शिलेवरी उगाळिती तत्तेज तो तों चढे,
जों जो बद्ध तुला करूं बघति तूं स्वच्छंद तो तो गडे.

कोंडोनी अपकीर्ति होइ न तुझी सत्कीर्ति होते परी,
दडोनी दुबळी नव्हेच उलटी होशी बलाढ्या खरी,
ज्यांना त्वद्गुण ठाउके, निज गृही त्वद्भक्त जे गाजती,
येथें तेच तुझ्या वधार्थ उठती ही नीति गे कोणती ?



## ५ : शाहणी बाहुली

या बाई या, बघा बघा कशि माझि बसलि बया;

ऐकुं न येतें, हलुहलु आशि माझि छबि बोलते.

डोळे फिर्विते, टुलुटुलु कशि माझि सोनि बघते.

बघा बघा तें, गुलुगुलु गालांतच कशि हंसते.

मला वाटते, इला बाई सारे कांहिं सारें कळते.

सदा खेळते, कधिं हट्ट धरुन न मागे भलते.

शाहणि कशी, साडिचोळि नवी ठेवि जशिच्या तशी.



# गोविंदाग्रज

( राम गणेश गडकरी )

## १ : ती कोण ?

दूरस्था जलधीकडे स्वहृदया नेते नदी वाहुनी,
शोधाया रसिकास नित्य कविता हिंडे न आशा तुटे
भूलोकावर राहते कुमुदिनी चंद्राकडे पाहुनी,
रात्रीमागुनि धावतो दिवसही, की भेट व्हावी कुठे ?

जीवाचे जगणे असेच असते सापेक्ष प्रेमावरी !
डोळेभेट दुरून, भाव अथवा आशाहि त्याला पुरे,
मी हे पाहुनि जीवबंधन असे शोकार्त होतो परी,
काकी या मम लक्ष्यशून्य हृदयी काही न आशा स्फुरे !

ओठाशी भिडते रहस्य मनिचे—सांगू कुणाला परी ?
अश्रू हे नयनीहि—माळ करुनी घालू कुणाच्या गळां ?
आले हे भरुनी रिते हृदयही—देऊ कुणाच्या करी ?
आला दाटुनि कठ—हाय ! रडुनी कोठे करू मोकळा ?

जी माझ्यास्तव, मी जिचे सकलही, आधार जी जीवनीं
देवा ! भेटविं—दाखवी तरि मला ती कोण देवी जनीं ?



## २ : विरामचिन्हें

जेव्हां जीवनलेखनास जगती प्रारभ मी माडिला,
जो जो दृष्टिंत ये पदार्थ सहजी वाटे हवासा मला !
बाल्याची पहिली अशी बदलली दृष्टी सदा बागडे,
तेव्हां ' स्वल्पविराम ' मात्र दिसती स्वच्छंद चोहीकडे !

आहे काय जगात ? काय तिकडे ? हे कोण ? कोठे असे ?
सागा ईश्वर कोण ? त्या पलिकडे ते काय ? केव्हा ? कसे ?
जे ते पाहुनि यापरी भकतसे, दृक् सशये टाकित,
सारा जीवनलेख मी करितसे तै 'प्रश्नचिन्हा'कित !

अर्धांगी पुढती करी वश मना, शृगारदेवी नटे.
अर्धे जीवन सार्थ होइल इथे साक्षी मनाची पटे;
प्रेमाने मग एकजीव बनता भूमीवरी स्वर्ग ये !
केला ' अर्धविराम ' तेथ, गमले येथून हालू नये !

झाली व्यापक दृष्टि, चित्त फिरले साश्चर्य विश्वातरीं,
दिक्कालादि अनतरूप बघता मी होत वेड्यापरी !
सूक्ष्मस्थूलहि सारखी भ्रमविती, लागे मुळी अत न,
त्या काळी मग जाहले सहजची ' उद्‌गार 'वाची मन !

आशा, प्रेम, नवीन वैभव, तशी कीर्तिप्रभा, सद्यश
ही एकेक समर्थ आज नसती चित्ता कराया वश !
सर्वांचा परमोच्च सगम चिर जेथे असे जाहला,
देवा ! ' पूर्णविराम ' त्या तव पदी दे शीघ्र आता मला !

## ३ : प्रेम आणि मरण

"जगीं सांगतात प्रीत पतंगाची खरी ।
झड घालून प्राण देतो दीपकाचे वरी

—श्रीहोनाजी बाळ

कुठल्याशा जागीं देख
मैदान मोकळे एक ॥ पसरले
वृक्ष थोर एकच त्यांत
वाढला पुऱ्या जोमात ॥ सारखा
चहुकडेच त्याच्याभवते
गुडघाभर सारे जग ते ॥ तेथले
झुडुपेच खुरट इवलालीं
मातीत पसरल्या वेली ॥ माजती
रोज ती । कैक उपजती । आणखी मरती
नाहिं त्यां गणती । दादही अशांची नव्हती । त्याप्रती

त्यासाठी मैदानांत
किति वेली तळमळतात ॥ सारख्या
परि कर्माचे विंदान
कांहीं तरि असते आन ॥ चहुंकडे
कोणत्या मुहूर्तावरती
मेघांत वीज लखलखती ॥ नाचली
त्या क्षणी । त्याचिया मनीं । तरंगति झणीं
गोड तरि जहरी । प्रीतीच्या नवथर लहरी ॥ न कळता

तो ठसा मनावर ठसला
तो घाव जिव्हारी बसला ।। प्रीतिचा
वेड पुरे लावी त्याला
गगनातिल चचल बाला । त्यावरी
जातिधर्म त्याचा सुटला
सबंध जगाशी तुटला ।। त्यापुढे
आशाहि । कोठली कांहिं । राहिली नाहिं
सारखा जाळी । ध्यास त्यास तीन्ही काळीं ।। एक तो

मुसळधार पाउस पडला
तरि कधी टवटवी त्याला ।। येइना
जरि वारा करि थैमान
तरि हले न याचे पान ।। एकही
कैकदां कळ्याही आल्या
नच फुलल्या काही केल्या ।। परि कधीं
तो योग । खरा हटयोग, । प्रीतिचा रोग
लागला ज्याला । लागते जगावे त्याला ।। हे असे

ही त्याची स्थिति पाहुनिया
ती दीड वितीची दुनिया ।। बडबडे
कुणि हसे कुणी करि कींव
तडफडे कुणाचा जीव ।। त्यास्तव
कुणि दयाहि त्यावरि करिती
स्वर्गस्थ देव मनिं हंसती ।। त्याप्रती
निंदिती । कुणी त्याप्रती । नजर चुकविती
भीतिही कोणी । जड जगास अवजड गोणी ।। होइ तो

इष्काचा जहरी प्याला
नशिबाला ज्याच्या आला ॥ हा असा
टोकाविण चालू मरणे
ते त्याचे होते जगणे ॥ सारखे
हृदयाला फसवुनि हसणे
जीवाला न कळत जगणे ॥ वरिवरी
पटत ना । जगी जगपणा । त्याचिया मना
भाव त्या टाकी । देवातुनि दगडाचि बाकी ॥ राहतो

यापरी तपश्चर्या ती
किति झाली न तिला गणती ॥ राहिली
इंद्राच्या इंद्रपदाला
थरकाप सारखा सुटला ॥ भीतिने
आश्चर्ये ऋषिगण दाटे
ध्रुवबाळा मत्सर वाटे ॥ पाहुनी
तो स्वता । तपोदेवता । काल संपतां
प्रकटली अती । "वर ब्रूहि" झाली वदती ॥ त्याप्रती

"तप फळास आले पाही
माग जे मनोगत कांही ॥ यावरी
हो चिरंजीव लवलाही
कल्पवृक्ष दुसरा होई ॥ नंदनी
प्रळयीच्या वटवृक्षाचे
तुज मिळेल पद भाग्याचे ॥ तरुवरा"
तो वदे । "देवि सर्व-दे, । हेच एक दे—
भेटवीं मजला । जीविच्या जिवाची बाला ॥ एकदां"

सांगती हिताच्या गोष्टी
देवाच्या तेतिस कोटी ॥ मग तया
" ही भलती आशा बा रे
सोडिं तूं वेड हे सारे ॥ घातकी
स्पर्शासह मरणहि आणी
ती तुझ्या जिवाची राणी ॥ त्या क्षणीं
ही अशी । शुद्ध राक्षसी । काय मागसी
माग तूं कांहीं । लाभले कुणाला नाहीं ॥ जे कधीं "

तो हंसे जरा उपहासें
मग सवेंच वदला त्रासे ॥ त्यांप्रति
" निष्प्रेम चिरंजीवन ते
जगिं दगडालाहि मिळते ॥ धिक् तया
क्षण एक पुरे प्रेमाचा ।
वर्षाव पडो मरणांचा । मग पुढे "
निग्रहे । वदुनि शब्द हे । अधिक आग्रहे
जीव आवरुनी । ध्यानस्थ बैसला फिरुनी ॥ वृक्ष तो

तो निग्रह पाहुनि त्याचा
निरुपाय सर्व देवांचा ॥ जाहला
मग त्याला भेटायाला
गगनांतिल चंचल बाला ॥ धाडिली
धावली उताविळ होत
प्रीतींची जळती ज्योत ॥ त्याकडे
कडकडे । त्यावरी पडे । स्पर्श जो घडे
वृक्ष उन्मळला । दुभंगून खाली पडला ॥ त्या क्षणीं

दुभंगून खालीं पडला
परि पडतां पडता हंसला ॥ एकदां
हर्षाच्या येउनि लहरी
फडफडुनी पाने सारी ॥ हांसली
त्या कळ्या सर्वही फुलल्या
खुलल्या त्या कायम खुलल्या ॥ अजुनिही
तो योग । खरा हटयोग, प्रीतिचा रोग
लागला ज्याला । लाभते मरणही त्याला ॥ हे असे

स्मरणार्थ तयाच्या ही बोलाची रानपालवी
मराठी रसिकासाठी ' गोविंदाग्रज ' पाठवी.



## ४ : अल्लड प्रेमास

क्षणभर वेड्या प्रेमा थाब ध्रु०

अधिर मनासह जासी कोठे ?
चुकशिल–संकटि पडशिल वाटे,
जग हे सारे बा रे खोटे !
हृदया सोडुनि, गड्या म्हणोनी, जाइ न कोठे लांब !

क्षणी पांढरा क्षणींच काळा,
रंग आवडे असा जगाला,
ठाव तयाचा कुणा न कळला !
खुळ्या तुलाची, अशा जगाची, कळेल का कृति सांग ?

जग सगळे हें देखाव्याचे !
गुलाम केवळ रे स्वार्थाचे !
स्मशान कीं हे शुद्धत्वाचे !
शुद्ध भाबडे, सरळ रोकडे, अशांत करिशिल काय ?

प्रेमा येथे शपथ लागते !
प्रासावाचुनि कविता अडते !
कर्त्यावाचुनि कार्यहि घडते !
देव बिचारा, तया न थारा, तुझी कथा मग काय ?

तुझ्यासारखा तुला सोबती—
मिळेल का या अफाट जगतीं ?—
—सकुचितहि हे अफाट जरि अति—
आणी न मना, अशी कल्पना, अगदी भोळा सांब !

कोणी तुजला मानिल खोटे,
तिरस्कारही दिसेल कोठे,
अपमानाचेही भय मोठे,
बाग जगाची, ही न फुलाची, कांटे जागोजाग !

टाकिल कुणि तुज धिक्काराने,
रडविल किंवा उपहासाने,
फसविल नकली कीं मालाने,
कोणी भटकत, उगाच रखडत, फिरविल मागोमाग !

म्हणुनि लाडक्या ! कुठे न जाई,
या हृदयांतचि लपुनी राही,
योग्य मित्र नच सुख तरि नाही !
कुसंगतीहुनि, वेड्या ! मानी, फार बरा एकांत !



## ५ : गोफ

पदर आणिले तुझे कांहिं तूं, माझे आणीं मीहि तसा
हांसत खेळत गोफ गुंफिला, कळले नाही कधीं कसा

एकामेकांभंवतीं फिरतां, गिरकी जीवांना आली
चढत चालला खेळ जसा तो, नजरहि धुंद तशी झाली

कुणीं निंदिले कुणीं वंदिले, कुणि हंसले रडलेहि कुणी
नाहिं पाहिले आम्हीं तिकडे, विश्व बुडाले प्रेमगुणीं

परि दैवाचा खेळ निराळा–खेळ नकोसा तुज झाला
ज्या खेळाने जीव रंगला, त्याचा कंटाळा आला

गोफ गुंफिला उलगडण्याचा कठिण काळ येउनि थडके
हाय ! वदावे काय, जिवलगे, ऊर तेवढा हा धडके

हळूहळू ओढणे हळु जरा, ओढायाची कां घाई ?
भलता धागा ओढितांच तूं, जीव जिवलगे, हा जाई

थांब, उलगडूं गोफ कठिण हा शांत बुद्धिने सखे असा–
कीं न तुटावा पदर एकही, धागा धागा नीट तसा

ना तरि होइल हानि आपुली आणि जगाचे हंसें तसे
एक्या ठायीं आलो कां वद दूर व्हावया सखे असे

कठिण असे, तरि उलगडणे हा गोफ असे आतां भाग
ना तरि त्याचा पीळ राहुनी छळील तो जागोजाग

मनापासुनी जे केले, जे मान्य जिवांनाही झाले
विमनस्कपणे परी आज ते निस्तरणे नशिबी आले

कठिण जोडणे परी तोडणे सुकर वाटते जनाप्रती
उलटा अनुभव आला आम्हां, गुंग जाहली इथे मति !

खेळतां गुंफिला गोफ, जीव त्यालागिं वाहिला
'गोविंदाग्रज' सागेना—की त्याचा पीळ राहिला !



## ६ : परमाणूंचें कार्यमाहात्म्य

गिरिशिखरे खरतांना त्यांतुनि कण वाळूचे पडतात,
महासागरोदरीं तेथुनी विश्रातीस्तव दडतात,

कालमापनास्तव जन त्यांना घटिकायंत्री भरतात,
क्षणाक्षणासह एक एक ते खालीं भरभर झरतात;

गिरिस्वरूपा उन्नतिच्या ते करिती देहाची घटना,
विस्तारास्तव शय्यारचना मग करणे लागे त्यांना;
झटति अनंतर अनंतांतही शोधायास्तव परिमाणा,
कालस्वरूप कालाचीही मोजिति घटका भरताना;

निजकवनाचे मसिलेखन हे, पुसुनि न जावे क्षुद्र तरी;
'गोविंदाग्रज' यास्तव त्यावरि वाळूचे कण हे पसरी



## ७ : चिन्तातुर जन्तु !

" निजले जग; कां आतां इतक्या तारा खिळल्या गगनाला ?
काय म्हणावे त्या देवाला--" "वर जाउनि म्हण जा त्याला."

" तेज रवीचे फुकट साडते उजाड माळावर उघड्या
उधळणूक ती बघवत नाही--" "डोळे फोडुनि घेच गड्या."

" हिरवीं पाने उगाच केली झाडांवर इतकी कां ही ?
मातिंत त्यांचें काय होतसे ?–" " मातिस मिळुनी जा पाहीं !"

" पुराबरोबर फुकटावारी पाणी हें वाहुनि जात
काय करावे जीव तळमळे--" " उडी टाक त्या पूरांत !"

" ही जीवांची इतकी गरदी जगात आहे का रास्त ?
भरती मूर्खांचीच होत ना ?" " एक तूंच होसी जास्त !"

देवा, तो विश्वसंसार राहूं द्या राहिला तरी
या चिन्तातुर जन्तूंना एकदा मुक्ति द्या परी !



## ८ : फूल ना फुलाची पाकळी !

शहाजहानाआधीं मेली ख्यालिखुशाली ती त्याची
खडा तेवढा ताजमहालच भूषा जी या जगताची.

चुकल्या तरुणा ! वेश्याक्रीडन आज तुझें स्मरणांत नसे
कालिदासकृत शाकुंतल परि सरस्वतीच्या कंठिं असे

खुनी खड्यांनी भरले रांजण वाल्याचे फुटले सारे
उरले रामायण ते नटवी श्रीरामा निज आधारें.

गोकुळातल्या चोराचा नच गोपींना आतां त्रास
श्रीकृष्णाची गीता उरली द्याया मरत्या उल्हास.

गडगडणे, काळोख, विजा हीं गेली वळवाच्या मागें
अन्नब्रह्मचि साक्ष तयाची द्याया हे राही जागे.

कांटे सुकले फांदीवरती—धन त्यांची झाली राना
गुलाब देवा, तुम्हां वाहिला, गोड करुनि तो कां घ्याना?

दूषण वगळुनि भूषणमात्रे प्रभुपूजन करि काळ असें
तुम्हीं आम्ही कष्टी होणे हा कुठला मग न्याय असे !

गोविंदाग्रज' अर्पी ही स्वभावे चरणांवरी
रसिका, घ्या फूल नाहीं फुलाची पाकळी तरी !



# रेंदाळकर

( एकनाथ पांडुरंग रेंदाळकर )

## १ : प्रबोधन

उघडिं नयन ! रम्य उषा हसत हसत आली
अरुणकिरणमय वसना अवनी ही ल्याली ! ध्रु०

मंजु मधुर गान करित आनंदे भुवन भरित
विहगवृंद गगनिं उडत या सुरम्य कालीं !

हसति फुले, तरु डुलती लतिकागण नृत्य करिति
धावति या भ्रमरतती सुप्ति तुला आली !

स्निग्ध दृष्टि तव पडतां होय वृत्ति सुखभरिता
रविकरिं घनपंक्ति तथा स्वर्णमय जहाली !

सुप्रभात सुखकर हा दारुण तिमिरोत्करहा
रमवी सकलास पहा दिव्य विभवशाली !

ऊठ ऊठ ! तुजविण परि नीरस हे सुख सुन्दरि !
विफल गमत ते ज्यावरि दृष्टि न तव गेली !

विकचकमलगन्धि पवन शीतल करि तापशमन
त्यांत परी श्वसन तव न तप्त तनु जहाली !

खगकूजित, अलिरंजित लतिकातरुगणसिंजित
सुदति ! विफल सकल गमत तुजविण या कालीं !

गगन तरणिकररंजित चपल धवल घन विहरत
क्षणहि परि न दृष्टि वळत तव मुखिं दृढ ठेली !

ऊठ ऊठ ! सखि झडकरि नयनद्युति चपल पसरि
रम्य मधुर हास्य करी स्वर्ग आण खाली !

प्रेमाचा ओघ सरल वाहो तव मुखि अविरल !
अचरहि जग करुनि तरल बुडवि सुखि विशाली !



## २ : भाऊ भाऊ आम्ही सारे भाऊ

भाऊ भाऊ ! आम्ही सारे भाऊ आहो बरे !
स्वर्गावाचुनि दुसरे काही भुवनी नाहीच रे !

जिकडे तिकडे पीयूषाच्या मधुलहरी उसळती !
जिकडे तिकडे शांत मनोहर तेजे कोदाटती !

नक्षत्रांच्या माला घालुनि सारे आनंदुनी
कल्पतरूचा कुसुममरंद प्राशितात नंदनी !

रविकररंजित घनशकलांवरि बसुनि मुदे विहरती !
स्वयंप्रकाशे निबिड तमींही स्वच्छंदे चालती !

'मी' 'माझे' यावाचुनि जगतीं कांहीं नाहीं दुजे !
आत्मत्वाचे बीज पेरिले तेच चहुंकडे रुजे !

देश जाति वा धर्मपंथही, तिकडे पाही न मी !
सान थोर वा वृद्ध, भेद हा मानुनि होऊं श्रमी ?

असोत कोणी ते !—ते माझे, मी त्यांचा हें खरें !
प्रेमगुणाने गुफूं आपण सकलांची अंतरे !

प्रेमसमुद्री जलप्रवाहासम जाऊं मिसळुनी !
" भाऊ आपण ! " या गीताने नभ टाकू कोंदुनी !

एकत्वाची स्फुरदीपिका धरुनी हाती चला !
अवनतिचा अंधार नाशुनी कांति भरा निर्मला !

जग हे सारे प्रेमज्योती लावुनि उजळू त्वरे !
भाऊ आपण सर्व ! तत्त्व हे लोकां पटवू खरे !

चला चला तर करित गर्जना जाऊं द्वैतावरी—
अद्वैताचे साम्राज्य प्रिय पसरूं अवनीवरी !



## ३ : काव्यदेवीला

निसर्गमृदु पाद हे रुचिर काव्यदेवी ! तुझे,
कशास मग सांग या यमकशृंखला घातल्या ?
तुझी ललित नर्तने कुठुनि चालती स्वैरशी ?
स्वभावमधुरे ! किमर्थ तुज भूषणांची स्पृहा ?

न भावधन का तुझ्याजवळ ?—विश्व जे मोहवी-
तुझे हृदय शोभले गुणगणोदये मंगले !
कसा तुजसि मोह हा मग पडे जडाभूषणी ?
कुणी रचुनि शिपले माणिमये ! तुला मण्डिले ?

भरील नव रंग का रुचिर इन्द्रचापीं कुणीं ?
नको मृदु करावया मृदुल पद्मपत्रा कदा !
सुधाशुकलिकेस का धवलता कुणी अर्पिली ?
किमर्थ नव मंत्र ते शुचि करावया जान्हवी ?

सुगन्ध वितरावया झटत पारिजातास जो
झटो सतत तो सुखे, करिं न मी तया वारण !
निसर्गकविता असे मधुनिसर्गलीला खरी,
न हीन रमणीपरी तिजसि आवडे शृंखला !



## ४ : काय बरें झालें !

वनराणीपरि असावयाची हिंडत शेतांतुनी,
अशी कां खिन्न आज साजणी ?

हलुनि गव्हाच्या पिवळ्या लोंब्या हळूच वाऱ्यावरी
मजा ती कशी दिसे बघ तरी !

नदीकाठच्या शेतामधुनी 'राया' चाले कसा
मानकरि काय कोठला जसा !

बघ तिकडे 'पवळी' रवथ करित राहिली,
बघ तिकडे करडे कशी नाचनाचली !
तूं मात्र इथे आहेस उगी बैसली !

पण हा मोत्या पहा तर खरा गेला भांबावुनी
ऊठ ना खिन्नपणा सोडुनी !

हा डोंगर ठाकला, वाहतो ओढा दुसरीकडे
शेत हे तुझेच हो ना गडे ?

तुझ्या हातचा चारा खाया उतावीळ पाडसे
मुले हीं तुझी न का राजसे ?

या शेतामधली झाडे, पाने, फुले,
हे असो, प्राणही तुजला मी वाहिले !
तूं राणी, कांहीं उणे न तुज ठेविले !

कां ग मंजुळे ! मग मज बघतां खुदकन् ना हांससी,
चूक तरि काय जाहली अशी ?



## ५ : अजुनि चालतोंचि वाट

अजुनि चालतोचि वाट ! माळ हा सरेना !
विश्रान्तिस्थल केव्हा यायचे कळेना !

त्राण न देहांत लेश, पाय टाकवेना,
गरगर शिर फिरत अजी होय पुरी दैना !

सुखकर संदेश अमित पोचविले कोणा,
भार वाहुनी परार्थ जाहलो दिवाणा !

कांट्यांवरि घातलाचि जीव तयासाठीं,
हसवाया या केली किति आटाआटी !

हेच खास माझे घर म्हणुनि शीण केला,
उमगुनि मग चूक किती अश्रुसेक झाला;

दिन गेले, मास तसे वत्सरेहि गेलीं,
निकट वाटते जीवनसंध्या ही आली !

कुठुनि निघालो, कोठें जायचे न ठावे,
मार्गांतच काय सकळ आयु सरुनि जावे !

काय निरुद्देश सर्व जीवन मम होते
मरुसरितेपरि अवचित झरुनि जायचे ते ?

पुरे ! पुरे ही असली मुशाफरी आतां,
या धूळिंत दगडावर टेकलाच माथा !



# बालकवि

( त्र्यंबक बापूजी ठोमरे )

## १ : फुलराणी

हिरवेहिरवे गार गालिचे    हरित तृणाच्या मखमालीचे,
त्या सुंदर मखमालीवरती    फुलराणी ही खेळत होती.
गोड निळ्या वातावरणांत    अव्याज मने होती डोलत,
प्रणयचंचला त्या भ्रूलीला    अवगत नव्हत्या कुमारिकेला.
आईच्या मांडीवर बसुनी    झोके घ्यावे, गावी गाणी,
याहुनि ठावे काय तियेला    साध्या भोळ्या फुलराणीला ?

पुरा विनोदी संध्यावात    डोलडोलवी हिरवे शेत,
तोच एकदा हासत आला    चुंबून म्हणे फुलराणीला:—
"छानी माझी सोनुकली ती    कुणाकडे ग पाहत होती ?
कोण बरे त्या सध्येतून    हळुच पाहते डोकावून ?
तो रविकर का गोजिरवाणा    आवडला अमुच्या राणीना ?"
लाजलाजली या वचनानी    साधी भोळी ती फुलराणी !

आंदोली संध्येच्या बसुनी    झोके झोके घेते रजनी;
त्या रजनीचे नेत्र विलोल    नभी चमकती ते ग्रहगोल !
जादूटोणा त्यानीं केला    चैन पडेना फुलराणीला,
निजलीं शेते, निजले रान,    निजले प्राणी थोरलहान.
अजून जागी फुलराणी ही    आज कशी ताळ्यावर नाहीं ?
लागेना डोळ्याशीं डोळा    काय जाहले फुलराणीला ?

या कुंजांतुन, त्या कुजांतुन   इवल्याशा या दिवट्या लावुन,
मध्यरात्रिच्या निवात समयीं   खेळखेळते वनदेवी ही.
त्या देवीला ओव्या सुदर   निर्झर गातो; त्या तालावर—
झुलुनि राहिले सगळे रान   स्वप्नसगमी दंग होउन !
प्रणयचिंतनीं विलीनवृत्ति   कुमारिका ही डोलत होती;
डुलता डुलता गुग होउनी   स्वप्ने पाही मग फुलराणीः—

"कुणी कुणाला आकाशांत   प्रणयगायने होते गात,
हळुच मागुनी आले कोण,   कुणी कुणा दे चुंबनदान !"
प्रणयखेळ हे पाहुनि चित्ती   विरहार्ता फुलराणी होती;
तो व्योमीच्या प्रेमदेवता   वाऱ्यावरती फिरता फिरता—
हळूच आल्या उतरुन खाली   फुलराणीसह करण्या केली.
परस्परांना खुणवुनि नयनी   त्या वदल्या ही अमुची राणी !

स्वर्भूमीचा जुळवित हात   नाचनाचतो प्रभातवात,
खेळुनि दमल्या त्या ग्रहमाला   हळुहळु लागति लपावया
आकाशीची गभीर शाती   मदमद ये अवनीवरती;
विरू लागले सशयजाल,   संपत ये विरहाचा काल.
शुभ्र धुक्याचे वस्त्र लेवुनी   हर्षनिर्भरा नटली अवनी;
स्वप्नसंगमी रंगत होती   तरीहि अजुनी फुलराणी ती !

तेजोमय नव मडप केला   लख्ख पाढरा दहा दिशांला,
जिकडेतिकडे उधळित मोती   दिव्य वऱ्हाडी गगनीं येती;
लाल सुवर्णी झगे घालुनी   हासतहासत आले कोणी;
कुणी बाधिला गुलाबी फेटा   झकमकणारा सुंदर मोठा !
आकाशी चंडोल चालला   हा वाङ्निश्चय करावयाला;
हे थाटाचे लग्न कुणाचे ?   साध्या भोळ्या फुलराणीचे !

गाउं लागले मंगलपाठ   सृष्टीचे गाणारे भाट,
वाजवि सनई मारुतराणा   कोकिल घे तानांवर ताना !
नाचुं लागले भारद्वाज,   वाजविती निर्झर पखवाज,
नवरदेव सोनेरी रविकर   नवरी ही फुलराणी सुंदर !
लग्न लागते ! सावध सारे !   सावध पक्षी ! सावध वारे !
दंवमय हा अंत:पट फिटला   भेटे रविकर फुलराणीला !

वधूवरांना दिव्य रवांनीं,   कुणीं गाइली मंगल गाणी;
त्यांत कुणीसे गुफित होते   परस्परांचे प्रेम ! अहा ते !
आणिक तेथिल वनदेवीही   दिव्य आपुल्या उच्छ्वासांहीं
लिहीत होत्या वातावरणी   फुलराणीची गोड कहाणी !
गुंगतगुंगत कवि त्या ठायीं   स्फूर्तीसह विहराया जाई;
त्याने तर अभिषेकच केला   नवगीतानी फुलराणीला !



## २ : श्रावणमास

श्रावणमासीं हर्ष मानसी हिरवळ दाटे चोहिंकडे;
क्षणांत येते सरसर शिरवे, क्षणात फिरुनी ऊन पडे.
वरती बघतां इंद्रधनूचा गोफ दुहेरी विणलासे,
मंगल तोरण काय बांधिले नभोमंडपीं कुणि भासे !

झालासा सूर्यास्त वाटतो, सांज अहाहा ! तो उघडे;
तरुशिखरांवर, उच्च घरांवर पिवळेपिवळे ऊन पडे.

उठती वरती जलदावरती अनंत संध्याराग पहा;
सर्व नभावर होय रेखिले सुंदरतेचे रूप महा.

बलाकमाला उडतां भासे कल्पसुमांची माळचि ते,
उतरुनि येती अवनीवरती ग्रहगोलचि कीं एकमते.

फडफड करुनी भिजले अपुले पंख पाखरे सांवरिती,
सुंदर हरिणी हिरव्या कुरणीं निजबाळांसह बागडती.

खिल्लारे ही चरती रानी, गोपहि गाणी गात फिरे,
मंजुळ पावा गाय तयाचा श्रावणमहिमा एकसुरें.

सुवर्णचम्पक फुलला, विपिनी रम्य केवडा दरवळला;
पारिजातही बघता भामारोष मनीचा मावळला !

सुंदर परडी घेउनि हाती पुरोपकंठीं शुद्धमती
सुदरबाला या फुलमाला रम्य फुले-पत्री खुडती.

देवदर्शना निघती ललना, हर्ष माइना हृदयांत,
वदनी त्याच्या वाचुनि घ्यावे श्रावणमहिन्याचे गीत.



## ३ : तारकांचें गाणें

कुणि नाही ग, कुणि नाहीं
आम्हांला पाहत बाई.
शांति दाटली चोहिंकडे,
या ग, आतां पुढे पुढे.
लाजतलाजत,
हळूच हांसत,
खेळ गडे, खेळूं कांहीं,
कोणीही पाहत नाहीं.

सुदरतेला नटवून,
कोमलतेला खुणवून
प्रेमाच्या वसतीकरितां
जगदंतर फुलवूं आतां,
दिव्य सुरांनीं
गीते गाउनि
विश्वाला निजवायाला
वाऱ्याचा बनवूं झोला.

फेकुनि द्या इकडेतिकडे
या निर्मल अवकाशांत
दिव्यमोहिनी–
विश्वाला वत्सलतेने

थोडेसे दंवबिंदु गडे,
प्रेमाचे पेरूं शेत,
सवे गुगुनी
प्रेमाचे गाऊं गाणे.

सरितांच्या लहरीवरती
अर्धोन्मीलित फुलवोनी
कविहृदयांत
जाउनिया खेळू आतां

नाचूं या निर्भयचित्तीं,
लपूं चला कलिकात कुणी;
गरके घेत
ही गाणीं गाता गातां.

एखादी तरुणी रमणी
लज्जामूढा भीरुच ती
तिच्याच नयनी
धीट तिला बनवा बाई,

रमणाला आलिंगोनी
शंकित जर झाली चित्तीं,
कुणी बिंबुनी
भुलवा ग रमणालाही.

सुखस्वप्नांनी गुंगवुनी
आशा ज्या त्याच्या चित्तीं,
दयितचिंतनी,
दिवसां ही झुरली बाला,

पुण्यात्मे हसवा कोणी,
त्याच रचा स्वप्नांवरती;
विरहभावनी,
भेटूं द्या स्वपती हिजला!

अनेक असले खेळ करूं
सोडुनिया अपुले श्वास
प्रभातकाळी
होउनिया आपण राहूं;

प्रेमाशा विश्वांत भरूं
खेळवु नाचवुं उल्हास
नामनिराळीं
लोकांच्या मौजा पाहूं.

## ४ : पारवा

भिंत खचली, कलथून खांब गेला,
जुनी पडकी उद्ध्वस्त धर्मशाला;
तिच्या कौलारीं बसुनि पारवा तो
खिन्न नीरस एकांतगीत गातो.

सूर्य मध्यान्ही नभी उभा राहे,
घार मंडळ त्याभंवतिं घालिताहे,
पाक्षि पानांच्या शांत सावल्यांत
सुखे साखरझोपेत पेंगतात.

तुला नाही परि हौस उडायाची,
गोड हिरव्या झुबक्यात दडायाची,
उष्ण झळया बाहेर तापतात,
गीतनिद्रा तव आंत अखंडीत.

चित्त किंवा तव कोवळ्या विखारे
दुखलखुपते का सांग, सांग बा रे!
तुला कांहीं जगतांत नको मान?
गोड गावे मग भान हे कुठून?

झोप सौख्यानंदांत मानवाची
पुरी क्षणही कोठून टिकायाची?
दुःखनिद्रे निद्रिस्त बुद्धराज
करुणगीते घुमवीत जगीं आज.

दुःखनिद्रा ती आज तुला लागे;
तुझे जगही निद्रिस्त तुझ्यासंगे.
फिरे माझ्या जगतांत उष्ण वारें,
तुला त्याचे भानही नसे बा रे!



## ५ : मेघांचा कापूस

फिकट निळीनें रंगविलेला कापुस मेघांचा,
वरुनि कुणी गुलजार फिरविला हात कुसुंब्याचा;

त्यांतहि हंसली मंदपणे ती चंद्रकला राणी;
कडेकडेच्या मेघांवर ये मोत्यांचे पाणी.

इंद्रनिळाचा रंग बहरवी गिरिच्या अंगाला,
मधुन जळाची शुभ्र शोभते ती मोहनमाला;

चौबाजूंला थाट दाटला हा हिरवाळीचा,
सृष्टिसतीनें साज घेतला पाउसकाळीचा

यशस्विनी सौभाग्यदेवता माता जगताची,
त्या अंबेची घटस्थापना आज बसायाची;

घोर घनघटा भूलिंगाला प्रक्षाळुनि गेल्या—



## ६ : औदुंबर

ऐल तटावर पैल तटावर हिरवाळी घेउन
निळासांवळा झरा वाहतो बेटाबेटांतुन,

चार घरांचे गांव चिमुकले पैल टेकडीकडे;
शेतमळ्यांची दाट लागली हिरवी गरदी पुढें.

पायवाट पांढरी तयांतुनि अडवीतिडवी पडे;
हिरव्या कुरणांमधुन चालली काळ्या डोहाकडे,

झांकळुनी जळ गोड काळिमा पसरी लाटांवर;
पाय टाकुनी जळांत बसला असला औदुंबर.



## ७ : उदासीनता

कोठुनि येते मला कळेना
    उदासीनता ही हृदयाला.
काय बोचते ते समजेना
    हृदयाच्या अंतर्हृदयाला.

येथें नाहीं तेथे नाहीं,
    काय पाहिजे मिळवायाला ?
कुणीकडे हा झुकतो वारा ?
    हांका मारी जीव कुणाला ?

मुक्या मनाचे मुके बोल हे
घरे पाडिती पण हृदयाला.
तीव्र वेदना करिती, परि ती
दिव्य औषधी कसली त्याला !



# चरित्रविषयक, अर्थनिर्णायक व अवांतर टीपा

सूचना—ओळीचा क्रमाक पृष्ठावरील नसून त्या त्या कवितेतील आहे.

## १. नारायण वामन टिळक. ( १८६१-१९१९ )

टिळकाचे सुविद्य चिरंजीव श्री० देवदत्त टिळक यानीं अगदीं अलिकडे 'नारायण वामन टिळक. व्यक्तिदर्शन व काव्यविवेचन' हें पुस्तक लिहिले आहे. त्यावरून टिळकाचा जन्म ६ डिसेंबर १८६१ ला जिल्हा रत्नागिरी, तालुका दापोली, मुक्काम करजगाव येथें आणि मृत्यु ९ मे १९१९ ला मुंबईस झाला असें समजते. टिळकाचें मूळ गाव चिखलगाव. परतु त्याचें बालपण करजगावास आपल्या आजोळींच गेलें. त्याचे आजे बेडेकर व आई जानकीबाई हीं साधुवृत्तीचीं माणसें होतीं. त्याच्या पवित्र आचरणाचा व प्रेमळ वाणीचा कधींहि न पुसणारा संस्कार टिळकाच्या मनावर झाला होता. कोंकणच्या सुंदर निसर्गाच्या सान्निध्यात त्यानीं आपल्या बाल-वयातला किती तरी काळ घालविला होता. या अनुकूल वातावरणाचा परिणाम म्हणजे टिळकाना लहानपणापासूनच प्राप्त झालेली काव्यस्फूर्ति होय. या स्फूर्तीच्या अकुराचा पुढील ५८ वर्षांत हलुहळू विकास होत गेला.

टिळकाचे वडील वामनराव अतिशय कर्मठ व तापट होते. आपल्या स्वभावानें त्यानीं जीवनात हालअपेष्टा व दुःखें निर्माण करून ठेवलीं होतीं. त्याच्या जाचात टिळकाच्या आईचा १८७३ च्या सुमारास अंत झाला. आणि येथेच टिळकाचें बालपण संपलें. वयाच्या अवघ्या बाराव्या वर्षीं घरदार साभाळण्याची जबाबदारी त्याच्यावर येऊन पडली. यापुढें ते नाशकास आपल्या लहान भावडाना घेऊन राहूं लागले. मात्र वडिलाचा विचित्र स्वभाव आणि घरची व बाहेरची प्रतिकूल परिस्थिति याची तीव्र

जाणीव झाल्यामुळें ते या वेळेपासूनच धीरे धीरे चिंतनशील प्रवृत्तीचे बनत चालले.

नाशकास टिळकानीं विद्याभ्यासास आरंभ केला. गणेशशास्त्री लेले हे त्याकाळचे व्युत्पन्न पडित व नावाजलेले कवि होते. त्याच्यापाशीं टिळकानीं संस्कृत साहित्यशास्त्राचें व काव्याचें परिशीलन केलें. तें त्याच्या काव्या-शक्तीस उपकारक झालें. पुढें त्यानीं घरींच इग्रजी भाषेचा अभ्यास केला. १८७८ सालीं ते नाशिक हायस्कूलमध्यें इग्रजी चौथींत दाखल झाले. आणि पुढें दोन वर्षांनीं म्हणजे २५ जुलै १८८० ला सहाव्या वर्गात असतांनाच त्यानीं शिक्षण सोडलें. त्याचें शालेय शिक्षण लौकिक दृष्टीने अल्प असलें, तरी सस्कृत, मराठी व इग्रजी या तिन्ही भाषावर त्याचें प्रभुत्व होतें. या तिन्ही भाषातून ते समयस्फूर्त वक्तृत्व करीत आणि पारि-तोषकें मिळवीत. या वक्तृत्वगुणामुळेंच त्याच्या काहीं कविता प्रभावो-त्पादक उतरल्या आहेत.

१८८० सालीं टिळकाचा मनूताई गोखल्याशीं जलालपुरास विवाह झाला. विवाहानंतर मनूताई गोखले या लक्ष्मीबाई टिळक झाल्या. ‘ माझें मला द्या ’, ‘ माझी भार्या ’ ‘ सारथी ’ इत्यादि कवितात टिळकाचें आपल्या पत्नीवरील निःसीम प्रेम प्रकट झालें आहे.

या पुढला पधरा वर्षाचा म्हणजे १८८० पर्यंतचा काळ टिळकाच्या जीवनात अत्यंत अस्थिरतेचा व असतोषाचा गेला. मातेच्या मृत्यूनतर टिळक अंतर्मुख झाल्याचा उल्लेख मागें आलाच आहे. वाढत्या वया-बरोबर ते धर्म, तत्त्वज्ञान, आचार, विचार व व्यवहार याविषयीं अत्यत आस्थेनें व सूक्ष्मतेनें चिंतन करू लागले. सोंवळेंओवळें, स्पश्यास्पृश्यता, जातिभेद इत्यादिकासंबधींचे त्याकाळच्या मानानें पुढारलेले वाटणारे विचार ते उघड उघड प्रतिपादन करू लागले. या अवधींत त्यानीं निर-निराळ्या धर्मांचा तौलनिक अभ्यास केला. नव्यानेंच थाटलेल्या संसाराच्या सोयीसाठीं ते द्वारका, धामक, पुणें, मुबई, नागपूर, वणी, राज-नादगाव इत्यादि ठिकाणीं हिंडले. त्यानीं तीन वेगवेगळ्या ठिकाणीं तीन शाळा काढल्या, काहीं दिवस चालवल्या आणि त्या शेवटीं दुसऱ्यांना

सुपूर्त केल्या. कांहीं काळ त्यानीं कथाकीर्तनें व योगसाधनेंहि केलीं. १८८३ पासून १८९३ पर्यंत ते नागपुरात श्रीमत अप्पासाहेब बूटी यांच्या चिरंजीवाचे शिक्षक होते, या काळात त्यानीं काव्यकुसुमांजलि, विविधविषयतरंगिणी आणि ऋषि हीं मासिकें काहीं दिवस काढून पुढें बंद केलीं. निरनिराळीं नाटकें व काव्यें लिहिलीं. गोल्डस्मिथच्या डेझर्टेड व्हिलेजचें ' माझा ओसाड पडलेला गाव ' हें भाषांतर आणि पुढें विशेष प्रसिद्धि पावलेलीं ' माझी भार्या ' व बापाचे अश्रु ' हीं काव्यें याच अवधींतलीं आहेत. पुढें १८९३ च्या सुमारास राजनांदगावास जात असतांना आगगाडींत टिळकांची एका युरोपीयन मिशनऱ्याशीं गांठ पडली. सुरुवातीस वाङ्मय, मग संस्कृत वाङ्मय आणि शेवटीं धर्म याविषयीं त्या दोघांचें बोलणें झालें. तें होत असतांना आपल्या आजपर्यंतच्या अभ्यासाचें फल म्हणून टिळकांनीं त्या मिशनऱ्यापुढें आपल्या मनातील नवधर्माची रूपरेषा मांडून दाखवली. यावर त्यानें न्यू टेस्टमेंटमधलि काहीं भागावर खुणा करून त्याची एक प्रत टिळकांना भेट दिली. यानंतर टिळक दोन वर्षेपर्यंत ख्रिस्तीधर्माचा विचार करीत होते. शेवटीं धर्मांतर करण्याचा त्यांनीं निश्चय केला. आणि १० फेब्रुवारी १८९५ ला मुंबईस अमेरिकन चर्चमध्यें दुपारीं ४॥ वाजतां बातिस्मा घेतला.

टिळकांना धर्म या विषयाची स्वभावतांःच आवड व ओढ होती. सर्व दृष्टींनीं समाधान देईल अशा धर्माच्या शोधांत त्यांचा आत्मा सतत पंधरा वर्षे तळमळ तळमळ करीत होता. अखेरीला ख्रिस्ताच्या पुण्यपावन चारित्रात त्याला शांति व समाधान यांचा आढळ झाला. टिळकांनीं बाप्तिस्मा घेतला, तरी त्यांच्या पत्नी व चिरंजीव हीं दोघेंहि हिंदुधर्मांतच होतीं. पुढें पांच वर्षांनीं त्या दोघांनींहि विधिपूर्वक बाप्तिस्मा घेतला. धर्मांतरानंतर टिळकांना जुन्या धर्मांतील विरोधकांचा आणि नवीन धर्मांतील शिष्ट दांभिकांचा बराच त्रास झाला. परंतु ते सच्चरित्र, सश्रद्ध व आशावादी असल्यामुळें त्यानीं तो सौजन्यानें सहन केला. यानंतर ते अनेक वर्षे नगरच्या मिशनमध्यें मुख्य धर्मोपदेशक होते. मृत्यूपूर्वीं दोन वर्षे ते सातारच्या मिशनमध्यें जाऊन राहिले होते.

टिळक धर्मानें ख्रिस्ती होते खरे; पण देश, संस्कृति, भाषा आणि वाङ्मय या दृष्टींनीं ते हिंदूच होते. १९१५ सालीं मुंबईस भरलेल्या साहित्य संमेलनाच्या अधिवेशनात त्यानीं 'धर्मांतर म्हणजे देशांतर नव्हे' अशी घोषणा केली होती. हिंदी ख्रिस्ती समाजाचे आचारविचार शुद्ध राहावेत आणि भाषा विकृत होऊं नये यासाठीं त्यानीं पराकाष्ठेचे प्रयत्न केले.

टिळक समाजाभिमुख होते. १९०७ सालीं जळगावास जें पहिलें कविसंमेलन झालें, त्याच्या मागें टिळकाची प्रेरणा होती. शारदा–प्रसादन मंडळाचे ते सदस्य होते. या मंडळाच्या वतीनें प्रसिद्ध झालेल्या अभिनव काव्यमालेच्या दुसऱ्या भागाचे तेच संपादक होते. १९१५ सालीं मुंबईस जी प्रांतिक परिषद् झाली तिच्यात त्यानीं भाग घेतला होता. त्या सालच्या नाट्यसंमेलनाचे ते अध्यक्ष होते.

केशवसुत, दत्त व बालकवि या तिघा प्रमुख आधुनिक कवींना कविता-लेखनार्थ टिळकानीं उत्तेजन दिले होतें. बालकवि तर काहीं काळ त्याच्या मुलाप्रमाणेंच त्याच्या घरीं वाढले होते.

टिळक जसे कवि तसेच तत्त्वज्ञ होते. त्याच्यापाशीं भावनेच्या आवेगासरशीं उसळी घेणारें हृदय जसे होतें, तसेंच त्याला आटोपणारें विचारशील मस्तिष्कहि होतें. पन्नास-साठ वर्षांपूर्वीं समाजाच्या मनावर धर्माची घट्ट पकड असताना ज्या टिळकानीं केवळ व्यक्तिगत श्रद्धा व विश्वास याच्या बळावर धर्मांतर केले, त्याच्या ठिकाणीं बंडखोराचा आवेश किंवा त्वेष नव्हता हें म्हणण्यात काय अर्थ आहे? टिळकाना बंड हें केवळ बंड म्हणून प्रिय नव्हतें. जुन्या धर्मपरंपरेंत शिरलेल्या कर्मठपणाच्या आणि रूढीच्या जाचाची त्याना तीव्र जाणीव होती. तो जाच त्याना असह्य झाला होता. ख्रिस्ताच्या चरित्रात त्याना खऱ्या धर्माचीं लक्षणें दृष्टिगोचर झालीं आणि म्हणून पूर्ण विचार केल्यावर त्यानीं त्याचें अनुयायित्व पत्करलें. त्यात मनोधैर्य नव्हतें असें कसें बरें म्हणता येईल? आणि या ख्रिस्त-प्रणीत धर्मांत आणि आपल्या संतमतात तरी काय फरक आहे? तुकाराम हा टिळकाचा अत्यंत आवडता कवि होता. त्याच्या अभंगाच्या धाटणी-

वरच त्यानीं आपली ‘ अभंगाजलि ’ रचली आहे. तिचें मूळ व मर्म टिळकांच्या या खिस्तप्रणीत किंवा आपल्या संतप्रणीत भक्तिमार्गांच्या आवडींत आहे.

वास्तविक खिस्तदेवाचा अवतार हा आपल्या पूर्वेकडील आशियांत झालेला. परंतु त्याच्या मताचा प्रसार पाश्चिमेकडील युरोपात झाला आणि तिकडील ग्रेट ब्रिटनचा परतत्र भारतावर तावा असल्यामुळें खिस्ती मनुष्यास देशप्रेम, भाषाप्रेम अथवा परपराप्रेम असणें शक्य नाहीं असा आपला अपसमज होता. टिळकाच्या बाबतींत असा सशय घेणें अवास्तव आणि अनाठायीं आहे. १९१२ च्या दिल्लीदरबारावर टिळकाची जशी ‘ राजनिष्ठा ’ ही कविता आहे, तशाच चद्रशेखरादि कवींच्याहि कविता आहेत. त्याच्या देशप्रेमाबाबत जर शंका नाहीं तर मग ती टिळकाबाबत का असावी ? केवळ ते धर्मांतरित म्हणून जर ती असेल, तर ती अन्याय्य म्हणावी लागेल. रानडे, गोखले, मेहेता हे नेमस्ताग्रणीहि एका अर्थानें राजनिष्ठ होते. पण म्हणून त्याची देशभक्ति बेगडी होती असें मात्र नाहीं.

टिळकाना फुलामुलाचे कवि म्हणतात याचें कारण त्यानीं त्या विषयावर विपुल कविता लिहिली आहे. खरें पाहिलें तर टिळकानीं मुलांसाठीं कविता लिहिली नसून मुलाविषयीं लिहिली आहे. तिचे वाचक बाल नसून प्रौढ आहेत. पुन्हा तिचा संबध लहान मुलाच्या मनोविश्लेषणापेक्षा वात्सल्याच्या भावनेशीं अधिक निकटचा आहे. फूल हें प्रसन्नता, पावनता, पुण्यकारकता, प्रेमळपणा इत्यादि गुणाचें प्रतीक. निसर्गाशीं त्याचा मूल या नात्यानें संबंध. या भव्य आणि दिव्य निसर्गात परमेश्वराचा साक्षात्कार होतो ही दृढ भावना. परमेश्वराचा आणि धर्माचा प्रत्यक्ष परस्पर सबंध. या धर्माविषयीं टिळकाना जात्याच ओढ. तेव्हा फुलासंबधीं त्याची विपुल कविता असावी आणि ती लोकप्रिय व्हावी यात नवल तें कोणतें ? ईश्वर, निसर्ग, धर्म इत्यादिकाचें तत्त्वज्ञानाशीं निकटचें नातें आहे. तत्त्वज्ञान मुळातच गहन व नीरस असतें. तें सुगम व सरस करावयाचें तर त्यास काव्याची जोड हवी. टिळकानीं ती तशी दिल्यामुळेंच त्याचें ‘वनवासी फूल’ हें तात्त्विक खंडकाव्य सरस व रमणीय झालें आहे. वर्डस्वर्थ

व इमर्सन हे टिळकाचे आवडते कवि व तत्त्वज्ञ होते. ते आपल्या लेखनात ज्याप्रमाणें मधून मधून प्रचारकाची, शिक्षकाची व उपदेशकाची भूमिका वठवतात, त्याप्रमाणेंच टिळकहि मधूनमधून उपदेश करतांना दिसतात.

टिळकाच्या कवितेचा एक फार मोठा विशेष म्हणजे तिची प्रवृत्ति-परता. तिला स्वभावतःच ईशनिष्ठा व समाजसेवा याप्रमाणेंच गृहस्थाश्रम प्रिय आहे. टिळकाची स्त्रीकडे पाहण्याची दृष्टि निर्मळ व निकोप आहे. त्यात प्रेम आहे पण काम नाहीं. स्त्री ही सहधर्मिणी आहे ही उदार व उदात्त कल्पना त्याच्या स्त्रीविषयक प्रत्येक कवितेंत अनुस्यूत झाली आहे.

टिळकाची १८९५ पूर्वींची कविता जुन्या वळणाची आहे. तिची रचना प्रदीर्घ आणि भाषा संस्कृतप्रचुर आहे. यापुढील काळात टिळकानीं इंग्रजी कवितेचें अध्ययन केलें. त्यामुळे नंतरची कविता नव्या वळणाची आहे. तिच्यात क्वचित् अधूनमधून जुन्या रूपाचे अवशेष आढळतात. परंतु एकदर रचना प्रसन्न व प्रसादपूर्ण आहे. त्याची वाणी प्रेमळ आहे. आणि अर्थाच्या अनुरोधानें ती वाटचाल करताना दृष्टीस पडते. चमत्कृतिपूर्ण किचकट कल्पना, अबोध गूढाशय आणि पाडित्य-प्राचुर्य या अवगुणाचें तिला वावडें आहे. यामुळें ती वाचता वाचताच अर्थ सहज समजतो आणि विषय मनावर ठसतो.

## टिळकांचें काव्यवाङ्मय

१. टिळकाची कविता. २ अभगाजलि. ३ बालोद्यान. ४ भजन-संग्रह. ५ खिस्तायन (पहिले ११ अध्याय) ६ भक्तिनिरंजन ( टिळकाच्या कवितांचीं इग्रजी भाषातरें. )

### १. कुणास्तव कुणीतरी.

वृत्त–पृथ्वी.

ही कविता मूळ सप्टेंबर १८९९ च्या सुविचारसमागमात आली होती. तिच्यात नतर टिळकानीं किंचित् शाब्दिक फेरफार केले आहेत. ते अर्थबोधाच्या दृष्टीनें उचित असेच आहेत. या कवितेला एका इग्रजी

कवितेचा आधार आहे. कवि हा मूळ कवितेंतील भावनेशीं समरस झाल्यामुळें त्यानें केवळ त्या कवितेचा आधार मात्र घेतला. तिचें अक्षरशः भाषांतर करण्याच्या भानगडींत तो पडला नाहीं. त्यामुळेंच ही कविता उत्कृष्ट व उत्कट उतरली आहे. एकाद्या तेवणाऱ्या निराजनावर दुसरें एकादें निराजन उजळावें आणि मग जसें त्या दोघांच्या स्निग्धरुचिर कांतीकडे पाहिलें म्हणजे त्यापैकीं अगोदरचें कोणतें व नंतरचें कोणतें असें कोडें पडतें तसेंच या कवितेच्या बाबतींत झालें आहे.

प्रथमपुरुषी भाषा न योजतां 'कुणास्तव कुणीतरी' अशी तृतीयपुरुषी अप्रत्यक्ष भाषा योजल्यामुळेंच कवितेचें हृदयंगमत्व वृद्धिंगत झालें आहे.

पृ० १ ओ० १ **तरुलतांशिं वारा झुजे**—यांतील व्यंजना मोठी बहारीची आहे. तरुलता हे शब्द पतिपत्नीचे आणि वारा हा शब्द संसारातील संकटाचा व्यंजक आहे.

... ... ३ **भयानकाचि**—भयानकरस मूर्त होणें.

... ... ११ **महीधर**—झाडें.

... ... १३ **घनप्रसर**—ढगाचा पसारा. १३ व १४ या दोन ओळींतील विरोधामुळें आणि १४ व १५ या दोन ओळींतील चंद्र व चंद्रकांत हे शब्द पतिपत्नीचे व्यंजक असल्यामुळें हा चवथा संपूर्ण श्लोकच सरसरमणीय झाला आहे.

...२ ... २१ पत्नीच्या मधुर भाषणावर तोंडीं लावण्याच्या पदार्थांचा आरोप केला आहे. आणि जेवण जरी साधेंसुधें गरीबीचें असलें, तरी रुचकर व स्वादिष्ट आहे असें सूचित केलें आहे.

... ... २४ **प्रसन्नेक्षणीं**—प्रसन्न + ईक्षणीं—हंसऱ्या डोळ्यांनीं.

... ... २५ या व पुढच्या २६ व्या ओळींत पतिपत्नींवर अनुक्रमें निर्झर व निर्झरीचा आरोप केला असून त्यापासून उत्पन्न होणारा जो भोंवरा त्याचें साम्य मुलाशीं दाखविलें आहे. '**भोंवऱ्या**'वर श्लेष आहे. निर्झर व

निर्झरी याच्या मीलनानें उत्पन्न होणारा एक पाण्यांतला भोंवरा आणि लहान मुलाच्या खेळण्यातील भोंवऱ्याप्रमाणें घरभर गिरगिर फिरणारा मुलगा म्हणजे जणूं कांहीं पतिपत्नींचा खेळण्याचा भोंवराच.

... .... २८ **अपसारुनी**—दूर करून. या व पुढील २९ व्या ओळींतील तम, ऊन व पाऊस हे शब्द संसारातील अडीअडचणी व सुखदु:खें यांचें व्यंजक आहेत.

## २. केवढें हे क्रौर्य !

वृत्त–पृथ्वी. शेवटचा श्लोक, वृत्त–वसंततिलका.

ही कविता मूळ ऑगस्ट १९०१ च्या काव्यरत्नावलींत आली होती. तिच्यावर मराठी शीर्षकाच्याबरोबर ‘ How Very Cruel ’ हें इंग्रजी शीर्षक होतें. कवितेवर एक लांबलचक टीप होती. ती टिळकांच्या चरित्राच्या इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाची आहे.

[ टीप–हा एका पक्षिणीचा अल्प इतिहास वाचून पाहा आणि मग योग्य वाटल्यास देवानें निर्मिलेल्या ह्या सहजमनोहर, स्वभावरसिक जिवंत फुलाचा म्हणजे पक्षिकुलाचा केवळ खेळ म्हणून, किंवा आपल्या जिभल्याचे लाड पुरवावे म्हणून शेवटीं नुसत्या आपल्या टोप्या सजविण्यासाठीं नाश करावासा वाटल्यास खुशाल करा. ज्याच्या दर्शनानें प्रत्यक्ष प्रेताच्या मुखावर प्रसन्नता दिसूं लागावयाची, ज्याच्या आलापांनीं दगडालादेखील काव्यस्फूर्ति व्हावयाची, ज्याच्या लीला पाहून मन मारून पृथ्वीवर कोठें तरी पडलेल्या जीवन्मुक्ताला वात्सल्यानें वेड लागावयाचें, त्या पक्ष्याला ठार करायला धावणाऱ्यास काय म्हणावें हें आम्हाला समजत नाहीं. ]

या कवितेंत योजलेलीं दोन्ही वृत्तें करुणोदात्त विषयास पोषक अशींच आहेत. अशाच एका करुणकोमल प्रसंगाच्या दर्शनानें आदिकवीच्या मुखातून

> मा निषाद प्रतिष्ठा त्वमगमः शाश्वतीसमाः
> यत्क्रौन्चमिथुनादेकमवधीः काममोहितम्

हा अनुष्टुप् बाहेर पडला होता.

पृ० २ ओ० २ **स्तिमित दृष्टि**—ओली आणि कापणारी नजर.

... ... ८ **प्रभु पिता अनाथा सदा !**—सहजगत्या साधलेला व त्रिकालाबाधित सत्य असलेला हा एक अर्थांतर-न्यास आहे.

... ३ ... १० आणि यापुढील १३ ते १६ ओळींत कवीनें पक्षि-णीच्या मुखानें आणि २३ व २४ ओळींत स्वतःच्या मुखानें मनुष्याच्या हिंसक वृत्तीवर व क्रूरपणावर औप-रोधिक टीका केली आहे. ती अत्यंत परिणामकारक आहे.

... ... १९ ' माझ्याकुशींत ऊब नाहीं. तेव्हा माझ्या पुढ्यात निज-ण्याचा प्रयत्न करू नका ' येथें कारुण्याच्या उत्कटतेची कमाल झाली आहे.

... ... २२ **द्विजा**—पक्षिणी.

... ... २३ **उत्पल**—निळे कमल. पाखरूं निळ्या कमळाप्रमाणेंच कोमल व लोभस असल्यामुळें त्यावर हा आरोप केला आहे.

... ... २४ ते २८ मध्यें स्वभावोक्ति आहे. मृत पाक्षिणीचें हें शब्दानीं घेतलेलें छायाचित्र हुबेहूब आहे.

**३. बोंबाबोंब.**

चाल फकिराच्या खड्या सवालासारखी आहे. पहिले तीन चरण अंजनीगीताप्रमाणें १६।१६।१६ मात्राचे आहेत. मात्र तिसऱ्या चरणात ८।८ मात्राचे दोन भाग करून यमक साधलें आहे. चवथ्या चरणात १० ऐवजीं ११ मात्रा आहेत. शेवटच्या मात्रेचा उच्चार निसटता पुसटता म्हणजे जवळजवळ अश्राव्य असा आहे.

ही कविता प्रथम जानेवारी १९१४ च्या मनोरंजनात आली होती. होळीच्या दिवशीं देशाच्या तत्कालीन स्थितीविषयीं एका गृहस्थाशीं चर्चा चालू असताना टिळकाना ही कविता स्फुरली. या कवितेतील बोंबाबोंब

हा शब्द अशिष्ट व ग्राम्य आहे, म्हणून त्यावर कै. अ. ब. कोल्हटकर यानीं संदेश या आपल्या दैनिकात वारवार टीका केली होती. मला श्री. आनंदराव टेकाडे सागत होते कीं, ही कविता प्रसिद्ध झाली त्याच सुमारास टिळक नागपुरास रॉबर्टसन् हॉस्टेलमध्यें आले होते. त्यांना कै. जयकृष्ण केशव उपाध्ये व आनंदराव टेकाडे भेटण्यास गेले होते. भेटींत उपाध्यानीं बोंबाबोंब हा शब्द अश्लील म्हणून त्यावर आक्षेप घेतला. यावर टिळकानीं उत्तर दिलें कीं, त्या ठिकाणीं त्याच्याइतका जोरदार व समर्पक शब्द दुसरा कोणताच नाहीं. बोंबाबोंब म्हणजे अकारण आरडाओरडा.

पृ० ४ ओ० ३ **उघडीले ना...नयना** ? राष्ट्रीय जागृति झाली ना !

... ... ४ व ५ पूर्वी जरी अनेक घोडचुका घडल्या, तरी आता त्या सुधारण्याची शक्ति आहे.

... ... ९ **अमोघ...अनुभूति**–हे भूतकाळातले अनुभव भविष्य काळात अचूक फळ देणारे आहेत. त्याग केला तो हितार्थच.

... ... ११ व १२ देशात निरनिराळे गट व निरानिराळीं मतें असलीं तरी स्वातंत्र्यप्राप्ति हेंच सर्वांचें अखेरचें ध्येय आहे.

... ... १४ **तारा ...लागल्या**—आशागत वाटूं लागलें.

... ... १५ व १६ अनेक परचक्रे आलीं व गेलीं. पण हा देश आपल्या स्वत्वानें जिवत राहिला. याचें ध्येय जरी दूर असलें, तरी याच्या अगीं तें प्राप्त करण्याचें सामर्थ्य आहे.

,, ४ ओ० १७ **बकवा**—विनाकारण बडबड.

१९ व २० यात टिळकाचा आशावाद प्रकट झाला आहे.

### ४. महारथी.

वृत्त–पृथ्वी.

संसाराला रथाची व पतिपत्नींना त्याच्या दोन चाकांची दिलेली उपमा नेहमीं ऐकू येते. परतु या कवितेंत टिळकानीं पराक्रम करणाऱ्या पुरुषाला

महारथी आणि तो पराक्रम करीत असताना त्याला संकटांचा व अडी-अडचणींचा त्रास होऊं नये म्हणून त्या टाळण्याचा प्रयत्न करणाऱ्या त्याच्या स्त्रीला सारथी म्हटलें आहे. संसाराला दिलेली रथाची उपमा जुनीपुराणी असली, तरी पतिपत्नींचें महारथी व सारथी याच्याशीं दाखविलेलें साम्य नवीन व समुचित आहे. हीच उपमा नाट्याचार्य खाडिलकरांनीं 'पुरुष धनुर्धर ससाररथा सारथिसम भार्या' या चरणात गोविली आहे.

पृ० ५ ओ० ४ मुनि म्हणजे मौन धारण करणारा. तेव्हा मुनीप्रमाणें निवृत्त होऊन मुकाट्यानें बसू नकोस हा आशय.

... ... ६ या ओळींत ससारातील सुखदु:खें सूचित केलीं आहेत.

... ... ७ व ८ पत्नीच्या उद्योगितेवर सबल अश्विनीचा म्हणजे घोडीचा आरोप केला आहे.

... ... ९ इह व परलोक म्हणजे संसाराच्या रथाचीं दोन चाकें.

... ... १३ ते १६ या ओळींत कवींचें वास्तव स्वरूप कसें पराक्रमी आहे तें स्पष्ट केलें आहे.

## ४. माझ्या जन्मभूमीचें नांव.

वृत्त–मंदारमाला.

कवितेंतील उदात्त विषयाला साजेसेंच धीरगंभीर वृत्त आहे.

पृ० ६ ओ० १ सृष्टीचे अहोभाग्य कीं, तुझा भार तिला वाहण्यास मिळत आहे. भारताचा सृष्टींत समावेश आहे. त्यामुळें सृष्टि धन्यत्व पावली आहे. 'रूपसपन्न' या शब्दानें भारताच्या सुदर आकृतीची कल्पना सूचित केली आहे.

पृ० ६ ओ० २ 'कामधेनू', 'कल्पवल्ली' या शब्दानीं भारताची संपन्नता, समृद्धि व कोणाचीहि मनोकामना पूर्ण करण्याची शक्ति या गोष्टी सूचित केल्या आहेत.

**सदा**...........'**तुला**–शक, बर्बर, हूण, पठाण,

मोंगल, इंग्रज इत्यादिकाना तुझा अभिलाष उत्पन्न झाला. यात टिळकानीं हिंदुस्थानावरील परकीय आक्रमणाचा इतिहास आणला आहे.

पृ० ६ ओ० ४ ' मीं तरी कोठे न पाहिलें ' असा अन्वय.

... ... ५ ते ७ यात टिळकाचा आर्यसंस्कृतीचा अभिमान व आपलेपणा स्पष्ट झाला आहे.

... ... १२ व १३ यात टिळकाची शालीनता व्यक्त झाली आहे.

... ... १४ हिंदुस्थानाकडून साऱ्या जगाला शातीचे, प्रीतीचें, सुखाचे व समाधानाचे धडे मिळतील अशी टिळकाची दृढ धारणा होती.

... ... १६ ते १८ आपला जन्म हिंदुस्थानात झाला याबद्दल कवि स्वतःस अतिशय भाग्यशाली समजतो.

**५ लोकमित्र.**

चाल—अजि म्या ब्रह्म पाहिलें.

जुलै १९२१ च्या मनोरंजनाच्या ' मित्र ' अंकात या कवितेवर J. F Edwards या मिशनरी गृहस्थाची एक टीप आहे. [ थोड्या वर्षोपूर्वी काशीनाथपंत मित्र व टिळक आपल्या काहीं मित्रासह लोणावळ्यास गेले असता मित्राच्या अंगचे थोर गुण व त्याच्या सगतींत असणाराची उन्नति घडवून आणणारी त्याची मैत्री यामुळें कवि टिळक याना स्फूर्ति होऊन त्यानीं हें सुदर काव्य लिहिलें.]

पृ० ७ ओ० ४ **जी जीवीं......प्रीति**—ज्याना सत्य हें जीवाप्रमाणें प्रिय आहे.

... ... ५ **भूता** नको. **भूतीं** हवा. भूति म्हणजे सपत्ति, ऐश्वर्य.

.... ... ९ **जनपरिचर्या**—लोकसेवा, समाजसेवा.

... ... १० हेंच तत्त्वज्ञान टिळकानीं ' वनवासी फुला 'त माडलें आहे.

## २. लक्ष्मीबाई टिळक ( १८७०-१९३७ ).

लक्ष्मीबाई या नारायण वामन टिळक याच्या पत्नी. त्याचा जन्म १८७० मध्यें झाला. माहेरचें त्याचें नाव मनूताई गोखले. वयाच्या दहाव्या वर्षी म्हणजे १८८० साली जलालपुरास त्याचा टिळकाशीं विवाह झाला. यावेळीं त्याना अक्षरओळखहि नव्हती. मग शालेय शिक्षण कुठलें? १८९२ च्या सुमारास त्याना प्रथम अक्षरओळख झाली. टिळकाच्या पूर्वायुष्यातील लहरी व चचल स्वभावामुळें त्याना ससारात स्थैर्य अथवा स्वास्थ्य मिळालें नाहीं. पुढें १८९४ मध्यें टिळक धर्मांतर करणार अशी निश्चयात्मक वार्ता ज्यावेळीं त्याच्या कानीं पडली, त्यावेळीं त्याची मन:स्थिति अगतिक व कुठित झाली. त्याचें घर जुन्या वळणाचें होतें. त्या वेळचा हिंदुसमाजच मुळीं परपराप्रिय व कर्मठ होता. १८९५ मध्यें टिळकानीं जेव्हा खरोखरच बातिस्मा घेतला तेव्हा लक्ष्मीबाईची स्थिति एकाद्या जीवन्मृताप्रमाणें झाली. परतु उभयता पतिपत्नींचें परस्परावर अलोट प्रेम होतें. पाच वर्षांच्या विरहानतर १९०० मध्यें लक्ष्मीबाईनीं आपल्या मुलासह नव्या धर्माचा स्वीकार केला. अशा रीतीनें टिळक पतिपत्नींचें दीर्घ विरहानतर पुनर्मीलन झालें.

या पुढील आयुष्यात मात्र त्याना स्थैर्य व स्वास्थ्य याचा लाभ झाला. लक्ष्मीबाईची प्रतिभा आपल्या प्रेमळ पतीच्या सहवासात पालवली होती. जळगावास १९०७ मध्यें भरलेल्या कविसमेलनास त्यानीं 'तुम्हि कवी, भिकारीण मी हो तुमच्या दारीं' ही कविता पाठविली होती. तिचें कौतुक करताना स्वत: टिळकानीं

'प्रसाद आहे, प्रतिभाहि आहे.
प्रेमौघ गानातून नित्य वाहे'

हे जे उद्गार काढले होते ते लक्ष्मीबाईनीं पुढें सार्थ करून दाखविले. लक्ष्मीबाईना पाठविलेल्या एका पत्रात टिळकानीं काव्यासंबधीं पुढील कल्पना माडली आहे.—"काव्य म्हणजे काव्य. आधीं सौंदर्य व मग उपचार. सौंदर्य असलें म्हणजे सारें आलें." ही कल्पना लक्ष्मीबाईच्या कवितेला तंतोतंत लागू पडते.

लक्ष्मीबाईंनीं सुरुवातीस लिहिलेल्या कवितावरून कदाचित् टिळकांचा सफाईचा हात फिरला असेल. परंतु त्यात टिळकांच्या कर्तृत्वाचा अंश नव्हता हें त्यानीं टिळकांच्या पश्चात् कविता लिहिल्या, अपुऱ्या ख्रिस्तायनात ६५ अध्यायाची भर घातली आणि ज्यात जिवंत व जातिवंत काव्य आहे असे स्मृतिचित्राचे चार भाग निर्माण केले त्यावरून स्पष्ट आहे. याशिवाय १९३३ च्या नाशिक कविसमेलनाच्या स्वागताध्यक्ष म्हणून, १९३४ च्या नागपूरच्या ख्रिस्ती साहित्यसंमेलनाच्या अध्यक्ष म्हणून आणि १९३५ च्या स्वतःच्या सत्कारसमारंभाच्या उत्सवमूर्ति म्हणून त्यानीं जीं भाषणें केलीं तीं त्याच्या स्वतंत्र प्रज्ञेची द्योतक आहेत. लक्ष्मीबाईच्या लेखनात भावनाचा प्रामाणिकपणा, विचाराचा प्राजलपणा आणि भाषेचा साधेपणा हे गुण आहेत. आणि त्यावर विनोदाचा शिडकावा असल्यामुळें एकदर लेखन सरससुंदर झालें आहे.

## लक्ष्मीबाईचें वाङ्मय

१. भरली घागर. २ ख्रिस्तायन ( ६५ अध्याय ). ३ स्मृतिचित्रें-चार भाग ( शेवटच्या भागाचीं पहिलीं काहीं प्रकरणें ).

### १. कल्पना, विचार, शब्द.

जाति—बालानंद.

कल्पना, विचार व शब्द या तीन वस्तु साहित्याच्या निर्मितीस आवश्यक आहेत. त्या परस्परानुरूप असून त्याचा एकजीव झाला म्हणजे सरस व सुदर साहित्य निर्माण होतें. उलट क्लिष्ट व किचकट कल्पना, क्षुद्र व हलकेफुलके विचार आणि क्षुल्लक व निरर्थक शब्द याचीं सागड जुळली म्हणजे नीरस व रटाळ साहित्य उत्पन्न होतें. कल्पना व विचार हें जणूं एखादें जोडपें आहे आणि शब्द त्याचें अपत्य आहे. अशा कल्पनेनें लक्ष्मीबाईनीं ही तात्त्विक परंतु विनोदी कविता रचली आहे. कवितेच्या शेवटीं त्याचा विनय व्यक्त झाला आहे.

## २. मी तुझी मावशी तुला न्यावया आलें.

जाति–भूपतिवैभव.

रोजच्या घरगुती प्रसंगावरून लक्ष्मीबाईंना हें गीत स्फुरलें आहे. यात तीसचाळीस वर्षांपूर्वी आपल्या समाजात रूढ असलेल्या बालविवाहाच्या चालीवर मार्मिक टीका आहे. पण ती हसत खेळत केली आहे. तिच्यात समाजाला शिव्याशाप नाहींत. परतु त्याच्या दोषावर त्याला संताप येणार नाहीं अशा बेतानें बोट ठेवलें आहे.

पृ० ९ ओ० १ **भरली घागर** यात मुलीवर लहान वयात टाकलेल्या जबाबदारीची सूचकता आहे.

**शिरावर** हा शब्दहि भारी जबाबदारीचा सूचक आहे. **भरली घागर व बाळे** यातील विरोधामुळें सामाजिक व्यगाचे स्वरूप विशेषत्वानें उघड झालें आहे.

... ... २ **तूं उभी**?—हा प्रश्नहि सूचक आहे. म्हणजे या पोरवयात तुझ्यामागें इतकीं कामें आहेत कीं, स्वस्थ बसावयालाहि तुला सवड नाहीं.

**लागले .....डोळे**? या प्रश्नांतहि सूचकता आहे. म्हणजे तू माहेरच्या निरोपाची वाट पाहात आहेस.

... ... ३ व ४ या दोन ओळींत नादानुकारी शब्दानीं मुलीच्या मनाची उत्कंठा अभिव्यक्त केली आहे.

**गाडींत** माहेराहून कुणीतरी येईल हा ध्वनि आहे.

... ... ५ व ६ या ओळींत आशा–निराशा याच्या दोल्यावर झुलणाऱ्या मनःस्थितीचें शब्दचित्र आहे. एका घडीस दारावरून एखादा टांगा जाताना किंवा बाहेर काहीं चाहूल ऐकू आल्यास माहेराहून कुणी तरी आलें असावें असा तिला भास होतो. पण दुसऱ्या घडीला कुणी नाहीं हें दिसताच ती नाउमेद होते.

अशा वेळीं निराश झालेल्या पण जात्याच सुंदर असणाऱ्या त्या मुलीवर मेघातील चंद्राची उचित उत्प्रेक्षा केली आहे.

पृ० ९ ओ० ७, ८ व ९ या तीन ओळींच्या अंतऱ्यात सामाजिक दोषाचें दर्शन आहे.

**गुरुजन** म्हणजे घरातील वडिलधारीं माणसें किंवा समाजातील उपाध्यायवर्ग असाहि अर्थ घेता येईल.

... ... १२ ते २० मध्ये पोरवयाच्या माहेरवासिणीच्या मनाचे पापुद्रे हळुवारपणें उलगडले आहेत. हें गीत सामाजिक टीका व मनोविश्लेषण या दोन्ही दृष्टींनीं अप्रतिम आहे.

## ३. कावळा.

छंद—मोठा अभंग.

प्रस्तुत कविता लहान मुलासाठीं लिहिलेली असली, तरी तिच्यात काव्यमय केलेले तत्त्व प्रौढांनींहि लक्षात घेण्याजोगें आहे. कविता सवादात्मक आहे.

सुरूपता व कुरूपता या गोष्टी ईश्वराधीन आहेत. तेव्हा मानवानें सुरूपतेचा गर्व करू नये अथवा कुरूपतेला हसू नये हें तत्त्व या अभंगाच्या द्वारें मांडलें आहे.

पृ० १० ओ. १ ते ४ यात मुलाना सकाळीं उठण्याचा व देवाची प्रार्थना करण्याचा उपदेश केला आहे.

## ४ धुंधुर्मासाची खिचडी.

जाति—चंद्रकांत.

एकाच कवितेंत निरनिराळ्या विषयाची भेसळ झाल्यामुळें लक्ष्मीबाईंनीं या कवितेला ' धुंधुर्मासाची खिचडी ' हें नाव दिलें आहे. हा मूळ लांबलचक कवितेतला एक उतारा आहे.

वटवृक्षाचें पिंपरीवर प्रेम बसलें असा प्रसंग आहे. त्याचें हें कल्पनापूर्ण आणि विनोदपूर्ण वर्णन आहे.

## ३. केशवसुत (१८६६–१९०५)

केशवसुताचें सपूर्ण नाव कृष्णाजी केशव दामले. त्याचा जन्म जिल्हा रत्नागिरी, गाव मालगुड येथे १५ मार्च १८६६ ला झाला. 'नैऋत्येकडील वारा' या कवितेंत त्यानीं आपल्या जन्मग्रामाचा माल्यकूट असा आणि तेथील जगबुडी नदीचा जगदुद्धरा नदी असा उदात्तीकरण करून उल्लेख केला आहे. त्याचे वडील केसोपत हे रत्नागिरी जिल्ह्यामध्ये कोठेतरी तालुक्याच्या ठिकाणीं मराठी शाळेवर मास्तर असत. पेन्शन घेतल्यावर ते दापोली तालुक्यातील वळणे या खेडेगावीं राहू लागले. केशवसुताची 'एक खेडे' ही कविता याच गावावर असून 'सिंहावलोकन' ही आत्मपर कविता त्यानीं याच गावीं रचल्याचा निर्देश आहे.

केशवसुताचे मराठी सर्व शिक्षण रत्नागिरी जिल्ह्यातील खेड या गावीं झालें. १८८१ च्या सुमारास तें पूर्ण झालें. याच काळीं केशव गगाधर चितळे याच्या कन्येशीं त्याचा विवाह झाला. १८८२ मध्यें केशवसुताचे वडील बधु श्रीधरपत हे ग्रॅज्यूएट होऊन नुकत्याच उघडलेल्या बडोदा कॉलेजात सस्कृत व गणित या विषयाचे प्राध्यापक म्हणून नियुक्त झाले होते तेव्हा केशवसुत व त्याच्या पाठचे बधु मोरोपत हे पुढील इंग्रजी शिक्षणासाठीं बडोद्यास गेले. पण तेथें जाऊन त्याना पुरतें एक वर्ष झालें न झालें तोंच त्याचे वडीलबधु श्रीधरपत विषमज्वरानें वारले. तेव्हा पुढील शिक्षणासाठीं केशवसुत व मोरोपत याची रवानगी त्याचे मातुल करदीकर याच्याकडे वर्ध्यास करण्यात आली. त्यावेळीं वर्ध्यास शाळा नसल्यामुळें हे दोघे बधु नागपुरातील सिटी हायस्कुलात दाखल झाले. हे वर्ष १८८३ होय. केशवसुतास नागपुराचा उन्हाळा मानवला नाहीं. म्हणून ते पुढील विद्याभ्यासाकरिता पुढील सालीं पुण्यास न्यू इग्लिश स्कूलमध्यें इग्रजी चवथ्या वर्गात भरती झाले, आणि आणखी पाच वर्षांनीं म्हणजे १८८९ सालीं ते प्रवेशपरीक्षा पास झाले.

केशवसुताच्या कवित्वशक्तीचा प्रादुर्भाव प्रथम बडोद्यास झाला असावा असें श्री. रहाळकर सागतात. परंतु केशवसुताचे बधु मोरोपत व सीतारामपत तो नागपुरास झाला असें सागतात. नागपूरच्या वास्तव्यातच केशवसुताच

टिळकाशीं व वासुदेव बळवंत पटवर्धनाशीं परिचय झाला. केशवसुताची कविता पुस्तकरूपानें प्रथम त्यांचे मित्र हरिभाऊ आपटे यानीं प्रसिद्ध केली होती. त्यात घड्याळ, उत्तेजनाचे दोन शब्द व विद्यार्थ्यांप्रत या कविता नव्हत्या. या कविता नाट्यछटाकार दिवाकर याना पटवर्धनाकडून प्राप्त झाल्या होत्या. त्या त्यानीं फेब्रुवारी, मार्च व मे १९१८ च्या मनोरजनात प्रसिद्ध केल्या होत्या. गुलाबाची कळी ही कविताहि एप्रिल १८९६ च्या मनोरजनातून संशोधलेली होती. तेव्हा केशवसुताच्या या आरभकालातील कविता नागपुरास असताना पटवर्धनाच्या संग्रहीं राहिल्या असाव्यात असें वाटतें. यापैकीं उत्तेजनाचे दोन शब्द ही कविता नॉर्मन मॅकलॉडच्या कवितेचें भाषातर असून गुलाबाची कळी ही कविता मूळ गटेच्या वाइल्ड-रोझवरून फ्रॅन्झ शूबर्टनें इग्रजींत आणली आहे आणि केशवसुतानीं इग्रजी-वरून ती मराठींत उतरली आहे. त्या काळीं या कविता प्राथमिक रीडर्स-मध्यें असत. केशवसुताच्या अभ्यासक्रमात त्या असाव्यात आणि त्याचें त्यानीं मराठीकरण केलें असावें. परंतु हें मराठीकरण वेडेवाकडे असल्यामुळें त्यानीं बहुधा या कविता आपल्या संग्रहीं ठेवल्या नसाव्यात. केशवसुत पुण्यास गेल्यानतर त्याचा नागपूरच्या पटवर्धनाशीं पत्रव्यवहार चालू होता असें 'वा. ब. पटवर्धन मु. नागपूर यास' या कवितेवरून दिसतें. याच सुमारास टिळकाचीहि 'घड्याळ काय म्हणतें ?' या मथळ्याची एक कविता छापून प्रसिद्ध झालेली होती. तेव्हा कदाचित् केशवसुताच्या कवितालेखनाचा आरंभ नागपुरास झाला असणेंहि सभवनीय आहे.

१८९० ते १८९६ केशवसुत मुंबईस कधीं मिशनशाळेंत तर कधीं ज्ञानोदय कचेरींत, कधीं कस्टम खात्यात तर कधीं कल्याणास तात्पुरत्या नौकऱ्या मिळवून दिवस काढीत होते. मध्यंतरीं एक वर्षभर ते सावत-वाडीस होते. त्यानीं 'सध्याकाळ' ही कविता तेथेंच रचल्याचा निर्देश आहे. १८९३ च्या सुमारास त्यानीं मुबईस बिऱ्हाड थाटलें होतें. परंतु १८९७ मध्यें प्लेगमुळें त्यानीं मुंबई सोडली. आणि खानदेशात भडगाव येथें ते दुय्यम शिक्षक झाले. १९०१ पासून ते फैजपूर येथें ए. व्ही. स्कूलचे हेडमास्तर झाले. १९०३ सालीं ते धारवाड येथील सरकारी हायस्कुलात

मराठीचे शिक्षक म्हणून गेले. पुढें १९०५ सालीं सुट्टींत ते आपले चुलते हरि सदाशिव दामले यांच्याकडे गेले असताना प्लेग होऊन वयाच्या अवघ्या ३९ व्या वर्षीं ७ नोव्हेंबरला मृत्यु पावले.

केशवसुताचा स्वभाव अबोल व एकलकोंडा होता असें त्याचे बंधु सागतात. त्यानीं स्वतःहि 'नैऋत्येकडील वारा' या कवितेंत आपल्या किरकिरेपणाचा उल्लेख केला असून एका इंग्रजीपत्रात कवींच्या समेलना-संबंधीं आपला विरोध दर्शविला आहे. या स्वभावामुळे ते लहानपणापासून चिंतनशील बनले होते. सस्कृतसाहित्य किंवा प्राचीन मराठी कवितेपेक्षा त्याना इंग्रजी कविता अधिक प्रिय होती. 'गोल्डन ट्रेझरी' हा त्याचा आवडता कवितासंग्रह होता. वर्डस्वर्थ, शेले, कीटस्, बायरन् आदि रोमॅटिक् रिव्हाइवल्च्या काळातील कवींच्या काव्यावर त्याची विशेष भक्ति होती. त्याचप्रमाणें त्यानीं ज्यावेळीं म्हणजे १८८५ मध्ये विशेष हिरीरीनें लेखनास आरभ केला त्याच वेळीं दिवगत झालेला अमेरिकन तत्त्वज्ञ व कवि इमर्सन् हा त्याना विशेष पसंत होता. या सर्वांच्या विचाराचा त्यांच्या कवितेवर बराच प्रभाव पडला आहे. कवि आणि काव्य या विषयावर केशवसुताच्या जवळजवळ वीस बावीस कविता आहेत. त्यातली विचारसरणी त्यानीं इमर्सन्कडून घेतली आहे. फरक इतकाच आहे कीं, इमर्सनचे विचार गद्यात आहेत आणि केशवसुताचे विचार पद्यात आहेत.

केशवसुताच्या कवितेत दोन प्रकार प्रामुख्यानें दृष्टीस पडतात. त्याच्या काहीं कवितात मनोलेखन आहे आणि काहीं कवितात तत्त्वचिंतन अथवा विचारविवेचन आहे. केशवसुताच्या ठिकाणीं आत्मपरता अत्यत उत्कटत्वानें वसत होती. त्यामुळें त्याच्या वाणीला विलक्षण ओज चढलें आहे. मात्र मनोभावाच्या भरात त्यात भान राहात नाहीं आणि त्यामुळें त्याच्या विचारात विसगति, विरोध व विसवाद आदि दोष वारवार उत्पन्न होतात. एका ठिकाणीं ते–'देव कशाचे ? अश्रु जे पिती, पायपोस त्या हाणा संप्रति' असा आदेश देतात, तर त्याच कवितेंत दुसऱ्या ठिकाणीं 'देवाच्या मदतीस चला तर !' असें आवाहन करतात.

केशवसुताच्या गूढगीताना अर्थ आहे. 'झपूर्झा' ही स्थितप्रज्ञावर,

' कोणीकडून ग कोणिकडे ' ही अज्ञात भूत व भविष्य आणि ज्ञात वर्तमा
यावर, तर ' हरपलें श्रेय ' ही शैशवात समीप असलेल्या पण प्रौढ वया
दुरावलेल्या स्वर्गीय आनंदावर लिहिलेलीं गीतें आहेत. केशवसुताच्य
तोकड्या व संदिग्ध भाषेमुळे त्याचा अर्थ उलगडण्यास कष्ट पडतात इतकेंच

केशवसुताच्या लेखनारंभाच्या काळींच या देशात राजकीय व
सामाजिक चळवळींना सुरुवात झाली होती शिक्षणाचा हळूहळू प्रसार होत
होता. स्त्री ही पुरुषाची सहचर आहे ही कल्पना धीरे धीरे मूळ धरत होती
साहित्यात कलेपेक्षा जीवनास आणि दैनंदिन आयुष्यात कृत्रिमतेपेक्ष
नैसर्गिकतेस अधिक प्राधान्य आहे हे विचार समाजात प्रसृत होत होते.
केशवसुताच्या कवितेवर या सर्वांचा परिणाम झाला आहे. त्यानीं राज-
कारणात स्वतंत्रतेचा आणि समाजकारणात सुधारणेचा पुरस्कार केला आहे.

स्वत.च्या काळाशीं समरस होणारा केशवसुतासारखा दुसरा कवि
झाला नाहीं. त्या काळीं दळणवळणाच्या नव्या नव्या साधनामुळें आपल्या-
कडील जुनी समाईक कुटुंबपद्धति जाऊन तिची जागा नवीन विभक्त-
पद्धति घेत होती. अशा वेळीं दोलाचल होणाऱ्या मनाचें चित्रलेखन
केशवसुतानीं 'घराकडील गोष्टी,' 'नैर्ऋत्येकडील वारा' व 'सिंहावलोकन' या
कवितात केले आहे. त्याकाळीं शाळाखातें आणि वर्गांतील काळे फळे
व खडू इत्यादि सामग्री अनोळखी व नवखीच होती. केशवसुतानीं
' अधार जो फलक होत असे अम्हातें, चेतोनिबद्ध जनचित्र लिहावयातें '
या ओळींत तिचा समुचित उपयोग करून घेतला आहे. ' फुकट दवड-
लेल्या तासा 'त नव्यानेंच आलेल्या कालनिदर्शन यंत्राचा, ' असे कांता
रोगार्त 'मध्यें विद्युत्संदेशाचा आणि ' नैर्ऋत्येकडच्या वाऱ्या 'त कातेच्या
पत्राचा उल्लेख करून त्यानीं या नव्या सुधारणाकडे आपण किती
जागरूकपणें पाहात आहोंत तें पटवून दिलें आहे. '—प्रत 'मध्यें ऊर व
नाडी याच्या तपासणीच्या निमित्ताने नवीन वैद्यकीय साधनाचा स्टेथो-
स्कोपचा-अप्रत्यक्ष सूचक उल्लेख केला आहे. आणि ' काट्यावाचुनि
गुलाब नाहीं ' या कवितेंत—

' छायेवाचुनि कधीं प्रभा ती कुणीं पाहिली काय ?

'चित्र होतसे, जेव्हा छाया प्रभेस मिळुनी जाय'

या ओळींनीं त्या काळीं अगदीं नवा असलेला कॅमेरा सूचित केला आहे. केशवसुताची कविता त्यापूर्वींच्या कवींच्या कवितेपेक्षा नवी व निराळी वाटते ती यामुळेंच!

मराठी कवितेच्या रचनेमध्यें नव्या नव्या सुधारणा करण्याचे प्रयोग केशवसुतापूर्वींच्या पिढींतील कवींनीं केले होते. यमकाचें बधनहि तोडण्याचा केशवसुतानीं प्रयत्न केला नाहीं. यावरून त्याना रचनेच्या बाबतींत बडखोरी करावयाची होती असें म्हणता येत नाहीं. इंग्रजींच्या अनुकरणानें त्यानीं शार्दूलविक्रीडित वापरून मराठींत मिल्टोनिक सॉनेट आणले. या परकीय प्रकारात भाव आणि विचार याचें सामजस्य व समवाय असल्यामुळें मनोलेखन व तत्त्वचिंतन करणाऱ्या केशवसुताच्या प्रकृतीस तो विशेष मानवला आणि मराठी काव्यवाङ्मयात कायमचा रुळून बसला.

केशवसुताची भाषा खडबडीत आहे. कित्येकदा त्याचे शब्दहि समर्पक नसतात. त्याची जातिरचना हवी तशी निर्दोष नाहीं. पण त्याच्या गुणसमुच्चयासमोर हे दोष कुठल्या कुठे पार उडून जातात.

## केशवसुतांचें काव्यवाङ्मय

१ केशवसुताची कविता.

### १. मजुरावर उपासमारीची पाळी.

वृत्त—इद्रवंशा. शेवटला श्लोक इद्रवज्रा वृत्तामध्यें.

या कवितेखालीं ७ जानेवारी १८८९ असा कालनिर्देश आहे. कालनिर्देशाबरोबर स्थलनिर्देश नाहीं. परतु या अगोदर पाच सहा वर्षांपासून मोठमोठ्या शहरातून गिरण्या सुरू झाल्या होत्या. आणि रोजीनें लागून हप्त्याच्या शेवटीं मजूरी मिळवणारा एक नवा श्रमजीवि वर्ग निर्माण होत होता. त्याला त्यावेळीं मजूर हें नाव होतें. हा वर्ग आर्थिक विषमतेंतून जन्मास येत होता. समतावादी व सहानुभूतिपर दृष्टिकोण असलेल्या

केशवसुताच्या लक्षात हा अन्याय येऊन चुकला होता. तसा अप्रत्यक्ष निर्देश या कवितेच्या ३ ऱ्या व ५ व्या श्लोकात आहे. ४ थ्या श्लोकात मजुराचा सोशिक व अल्पसंतुष्ट स्वभाव दाखवला आहे. तो चालू युगातील क्रांतिवादी मजुराच्या स्वभावापेक्षा भिन्न आहे हें खरें आहे. कारण त्या काळीं साम्यवादाला आजच्याइतकें बळ प्राप्त झालेलें नव्हतें. ५ व्या श्लोकात देवाचा उल्लेख आहे खरा. पण त्यात त्याच्या समदृष्टीचा उपहास आहे. कविता मजुराच्या तोंडची आहे. तेव्हा धारेवर, मावळती, कारभारिण इत्यादि शब्द साजेसेच पडले आहेत. परंतु 'मंदिर' हा शब्द 'देऊळ' या अर्थानें प्रयुक्त होत असल्यामुळें तो धनिकाच्या 'हवेली'साठीं योजणें बरें वाटत नाहीं. 'श्रीमंत' या शब्दासाठीं अलीकडे पुंजीपति अथवा मालक अथवा भांडवलवाले हे शब्द रूढ झाले आहेत. आज ज्या विषयाला राजकारणामुळें जागतिक महत्त्व प्राप्त झालें आहे, तो विषय केशवसुतांनीं ६० वर्षांपूर्वींच हाताळला होता हें पाहून त्यांच्या प्रतिभेविषयीं आदर वाटतो.

## २. रा. रा. बळवंत आपाजी दाते यांस.

वृत्त—शार्दूलविक्रीडित.

दाते हे विद्यार्थीवृंदातील एक होतकरू वक्ते होते. एका साप्ताहिक सभेंतील त्यांचें वक्तव्य ऐकून केशवसुतांना ही ओजोगुणयुत कविता स्फुरली. तिच्याखालीं पुणें १८८९ असा स्थलकालनिर्देश आहे. हे दाते पुढें फर्ग्युसन कॉलेजचे विद्यार्थी असतांना महाडास एका डोहांत बुडून वारले.

ही कविता लिहिली त्या सुमारास राजकीय व सामाजिक आंदोलनें सुरू होऊन पुरतें एक दशकहि लोटलें नव्हतें. तो आरंभींचा ताजा भर होता. त्या नव्या दमात आणि वाढत्या जोमानं केशवसुतांनीं आपल्या एका समवयस्क राष्ट्रभक्ताचें गौरव केलें आणि त्याच्या वक्तृत्वावर हें कवन लिहून त्याला महाराष्ट्रांत अमर केलें. देशाची अवनत स्थिति पाहून केशवसुतांना कसा उद्वेग वाटत असे तें या कवितेवरून स्पष्ट होईल.

पृ० १४ ओ० ३ व ४ दात्याच्या वक्तव्याचें प्रभावोत्पादक वर्णन. 'तडित्' व 'वारें' या शब्दानीं त्याचे हावभाव वादळाप्रमाणें अनावर असल्याचें सूचित केलें आहे. आणि 'गर्जना' व 'स्तंभितें' या शब्दानीं त्याची वाणी सिंहाच्या वाणीप्रमाणें धीरगंभीर होती आणि ती कानीं पडत असताना श्रोते स्तंभाप्रमाणें तटस्थ बसत असें सूचित केलें आहे. **स्तंभितें**—स्तंभ या नामापासून क्रियापद बनवले आहे.

... १५...६ **धुपुनियां** नाहीं. मुळात **धुवुनियां** आहे.

.... ... १४ वक्तृत्वावर वज्राचें रूपक. मागें पाचव्या ओळींत वृष्टीचे रूपक. तेथें वादळानंतर वृष्टि स्वाभाविकच होती.

... १९ व २० वृत्तसुखार्थ **जयजयकार** ऐवजीं जैजैकार असें लेखन. पण त्यामुळे जोर कायम.

## ३. सिंहावलोकन.

वृत्त—पृथ्वी.

ही कविता आत्मपर असल्यानें भावोत्कट उतरली आहे. कवितेखालील स्थलकालनिर्देशावरून केशवसुत यावेळीं वळणें येथें आपल्या वडिलाकडे आले होते असें दिसतें. केशवसुतानीं मुंबईस एकटें राहू नये, बिऱ्हाड करावें असा त्यांच्या वडिलाचा आग्रह असे. परंतु नौकरी तात्पुरती असल्यामुळें केशवसुत टाळाटाळ करीत. अशा एखाद्या प्रसंगीं वडीलमाणसाशीं त्यांची वादावादी होत असावी असें वाटतें. त्यामुळें केशवसुतांना पश्चात्ताप होई. या कवितेत त्यांचें पश्चात्तापपुनीत अंतःकरण उघड झालें आहे. सिंहावलोकन म्हणजे ज्याप्रमाणें सिंह कांहीं अंतर चालून गेल्यावर क्षणभर थबकतो आणि आक्रमिलेल्या टापूवर एक नजर टाकतो त्याप्रमाणें मागील आयुष्यावर दृष्टि टाकणें.

पृ० १५ओ.३ दृग्-डोळे.
... १६...८ धवलिता निशा—चादण्या रात्री,
... १३ ते१६ पश्चात्तापपुनीत अंतःकरणाचे शब्द.
स्वजनमानसे—नातलगाचीं मनें.
... ... १९ घनतमिस्त्र—दाट अधार ( निराशा ).

**४. क्षणांत नाहींसे होणारे दिव्य भास.**

वृत्त—शार्दूलविक्रीडित.

[ कवि, चित्रकार आणि तानसेन यास जीं अलौकिक स्वप्नें, ज्या दिव्याकृति आणि जे गधर्वालाप भासमान होतात,—अहह ! त्यापैकीं किती थोडे मात्र त्यास आपल्या करामतींत गोंवून ठेविता येतात बरें ! ] अशी या कवितेवर टीप आहे. तिच्यावरून केशवसुताना साहित्य, सगीत व चित्र या तीन ललितकलातील मूलभूत एकता मान्य असावी असें दिसतें. या एकतेलाच ‘ सुदरता ’ हें नाव आहे. वस्तुतः केशवसुताना ही कविता इमर्सनच्या ‘ लव्ह ’ या निबधावरून स्फुरली आहे. त्यात तो म्हणतो,—“ We cannot approach beauty .. What else did Gean Paul Riehter signify, when he said to music, “Away ! Away ! thou spackest to me of things which in all my endless life, I have not found, and shall not find. ” The same remark holds of painting. And of poetry, success is not attained, when it lulls and satisfies, but when it astonishes and fires us with new endeavours after the unattainable.” हेंच तत्त्व त्यानें ‘ सुंदरते ’ ला लावलें आहे. ज्यामुळें नवीन स्फूर्ति प्राप्त होईल अशा विभ्रमात व उद्दीपनात सुंदरतेचें खरें यश आहे. ते तिच्या समोहनात अथवा समाधानात नाहीं असें तो म्हणतो. याच तत्त्वाचें विवेचन करीत असताना त्यानें एक पुरातन रूपक-कथा सागितली आहे,—

'The soul of man, embodied here on earth, went roaming up and down' असा त्या कथेचा आरंभ आहे. त्या कथेचा पुढचा भाग असा:—'The Diety sends the glory of youth before the soul;...and man beholding such a person in the female sex runs to her, and finds the highest joy in contemplating the form, the movement and intelligence of this person, because it suggests to him that which is in the beauty, and the cause of the beauty' केशवसुतानीं हीच कथा जशीच्या तशी मराठीत आणली आहे. कवीचा आत्मा त्यास परिचित असणाऱ्या सौंदर्यतत्त्वाचा शोध घेत असतो. तें त्याला कधीं कधीं अप्सराच्या रूपानें भासिमान होतें. तो त्याच्याशीं तादात्म्य पावू इच्छितो, तोच व्यावहारिक जगाची हाक त्याच्या कानीं पडते आणि त्याची समाधि भंग पावते.

पृ. १७ ओ. १३व१४ **आक्का** म्हणजे व्यावहारिक किंवा सांसारिक कष्टाचे आणि काळज्यांचें जीवन. 'आक्काबाईचा फेरा' या वाक्प्रचारावरून केशवसुतांना हा शब्द सुचला असावा. 'रूढि, सृष्टि आणि कलि' या कवितेवरील टीपेंत हा शब्द त्यानीं आणखी एकदा वापरला आहे.

पृ० १७ ओ० २० केशवसुतांची ही एक आवडती कल्पना होती. ती त्याच्या काव्यात अनेकदां पुनरुक्त झाली आहे. पृथ्वीवर पापें आहेत आणि स्वर्गात सुखें आहेत. तेव्हा सामर्थ्य असतें तर आपण येथील दुःखाचा निरास केला असता आणि सुखाचा प्रसार केला असता असा त्याचा आशय आहे.

### ५. नवा शिपाई.

जाति—साकी अंतरा फटक्याचा.

मानव हा येथून तेथून एकच आहे, या मानवतावादाच्या तत्त्वावर आधारलेली ही कविता आहे. मानव जर स्वार्थरहित होऊन व्यापक दृष्टीचा झाला आणि विशाल जीवनात शिरला, तर मग जगात मानवा-मानवातले कलह होणार नाहींत असा या कवितेचा सूर आहे.

ही कविता केशवसुताना ' इमर्सन ' वाचत असताना सुचली असावी. साम्यासाठीं हीं काहीं स्थळें पाहाः—

Every thing is Kin of mine (Mithridates)

जिकडे जावें तिकडे माझीं भावंडें आहेत.

As I spoke, beneath my feet the ground-pine curled its pretty wreath—

—Each and All, Emerson.

कोठेंही जा पायाखालीं तृणावृता भू दिसते.

Over me soared the eternal sky.

कोठेंही जा डोईवरतें दिसतें नीलाबर तें

इमर्सननें वैदिक वाङ्मयाचीं भाषातरें वाचलीं होतीं. वर दिलेली पहिली कल्पना त्याला ' वसुधैव कुटुबकम् ' या उक्तीवर सुचली असावी. वस्तुतः केशवसुतानीं हें आपलेंच तत्त्वज्ञान वैदिक वाङ्मयावरून घ्यावयाचें तें इमर्सनवरून घेतलें.

नवा शिपाई म्हणजे नव्या युगातील नवीन दृष्टीचा शूरवीर.

पृ० १८ ओ० १ ते ९ यात कोत्या भेदभावाचा निषेध आहे.

... ...१०ते १८ यात ' हें विश्वचि कीं माझें घर ' या विशाल मानवतेच्या कल्पनेचा साक्षात् स्वीकार आहे.

... ... १९ **मी पूर्जी अपुल्याला** म्हणजे माझ्या ठिकाणीं असलेल्या विशाल मानवतेच्या भावनेची मी पूजा करतों.

पहा—' आत्मौपम्येन सर्वत्र...इ०'

पृ० १८ ओ०२१ व २२ 'मी' हा शब्द सपुष्टात आणणे म्हणजे विशाल मानव्याच्या भावनेला झुगारून केवळ स्वतःपुरतें आकुंचित दृष्टीनें पाहणें.

पृ०१९ ओ० २३,२४,२५ **लहान—मोठे**—समाजातील वरिष्ठ व कनिष्ठ.

**साधु—अधम**—सज्जन व दुर्जन.

**दूर—जवळ**—आप्त व परके

पृ० ... २८ ते ३६ यात सरळ विचार न माडता तो हलव्याच्या उपमेनें माडल्यामुळें क्लिष्टतेचा दोष उत्पन्न झाला आहे. मुळात सर्व माणसें हलव्यातील तिळाप्रमाणें भेदभावरहित असतात परतु त्याच्यावर निर-निराळ्या संस्कृतीचा पाक चढला म्हणजे तीं मूळ स्वरूप विसरून एकमेकाशीं भाडू लागतात. वास्तविक असें होऊ नये कवितेतला विचार अत्यत उदात्त आहे. परतु त्यासाठीं योजलेली हलव्याची उपमा अस्थानीं असून त्याचे काटे एकमेकाना बोंचतात ही कल्पना हास्यास्पद झाली आहे. या गभीर काव्यात उपमेचा मोह टाळता आला असता तर बरें झालें असतें.

## ६. सतारीचे बोल.

जाति—पादाकुलक.

केशवसुताच्या उत्कृष्ट कवितापैकीं ही एक कविता आहे. सगीतात मनुष्याच्या विषण्ण वृत्तीला प्रसन्न करण्याचें सामर्थ्य कसे आहे तें या कवितेंत दाखविलें आहे. या कवितेला ड्रायडनच्या अलेक्झाडर्स फीस्ट या कवितेचा आधार असावा असें काहींजणाना वाटतें. पण तें बरोबर नाहीं. या कवितेत सगीताच्या प्रभावाबरोबरच केशवसुतानीं अद्वयाच्या

आनदाचें तत्त्वहि विशद केलें आहे. त्यामुळेंच ही कविता इतकी परिणाम-कारक झाली आहे. हिच्यात एक दोन ठिकाणीं तुकारामाच्या संत-वाणीचा अनुवाद आहे. त्यावरून निव्वळ सगीताच्या प्रभावाला उपलक्ष करून ही कविता लिहिली नसावी असें वाटतें. मनुष्याला अमर आशा, अखंड आनद व अविचल शाति हवी असेल, तर त्यानें अखिल भेदभाव विसरून अद्वयात लीन झालें पाहिजे असा या कवितेचा अभिप्राय आहे.

सतारीचे **बोल** हा प्रयोग बरोबर नाहीं बोल तबल्याचे असतात. सतारीचे स्वर असतात.

पृ० २० ओ० २५ ते ३२ स्वभावोक्तीचें सुंदर उदाहरण.

...२१ .. ५३ व ५४ पाहा:—शुद्ध बीजापोटी
फळें रसाळ गोमटी —तुकाराम.

.. ५५ **गदा**–रोगाला.

...२२... ६३ **तम अल्प–द्युति बहु**–' तम ' व ' द्युति ' हे शब्द अनुक्रमें ' निराशा ' व ' आशा ' याचे व्यंजक आहेत.

६७ ते ७२ पाहा:—अणूहुनी थोकडा । तुका ब्रह्माडाएवढा.
Standing on the bare ground, my head bathed by the blithe air, and uplifted into infinite space all mean egotism vanishes. I become a transparent eye-ball. I am nothing, I see all, the current of the universal Being circulated through me I am part or parcel of good

— Nature By Emerson

अखिल भेद विसरणें म्हणजेच अद्वैत पटणें.

...२३...८१ ते ८८ ' ॐ शांतिः शांतिः शांतिः ' या त्रिवार घोषणेचा जसा मनावर परिणाम होतो तसाच तो या अखेरच्या पुनरुच्चारित ओळींचा होतो. केशवसुताची ही कविता विचारदृष्ट्या जितकी उदात्त तितकीच कलादृष्ट्या उत्कृष्ट आहे.

## ७. फुलपांखरूं.

जाति अंजनीगीत.

शेवटचा श्लोक वसंततिलका वृत्तात. ही कविता तिच्या मथळ्यावरून निसर्गविषयक वाटते खरी. पण केशवसुतांनीं फुलपांखराला उपलक्ष करून तिच्यात आपल्याच चिंतांचें, दुःखाचे आणि संकटांचें गाणें गाइलें आहे. ' फुलपांखरू ' हा शब्द Butterfly ला प्रतिध्वनि म्हणून त्या काळीं नव्यानेच मराठी कवितेंत प्रविष्ट झाला होता. यापूर्वी त्याला ' चितूर ' व ' पतंग ' हे प्रतिशब्द होते. या कवितेंत एक दोन ठिकाणीं केशवसुतांनीं शेलेचें अनुकरण केलें आहे. मूर्त वस्तूला उपमेय करून तिची अमूर्त कल्पनेशीं तुलना करावयाची ही शेलेची पद्धति होती. ती केशवसुतांनीं त्याच्याकडून घेतली आहे.

पृ० २३ ओ० ९ ही कल्पना शेलेच्या To A Skylark मधिल Like a poet hidden वरून, आणि

... २४ .. १३ ही कल्पना त्याच कवितेतील Like a high-born maiden वरून सुचली असावी.

... ... ... २१ ' **तिमिर** ' हा शब्द ' निराशे 'चा व्यंजक आहे.

... ... .. २३ **पुष्पपतंग** हें फुलपांखराचें संस्कृतीकरण.

... ... २५ व २६ यावर We look before and after And pine for what is not या विचाराची छाया आहे.

... ... .. ३१ **ग्रीष्माचें स्वरूप** हा प्रयोग संसारातील तापदायक संकटाचा व्यजक आहे. प्रत्यक्ष ग्रीष्माशीं त्याचा संबंध नाहीं.

.. . ३५ फुलपाखराला मरण आहे ही वस्तुस्थिति आहे. केशवसुताना तें माहीत नसेल असें नाहीं. परतु दैनदिन जीवनाच्या काळज्यामध्यें मनुष्याची जिवत असूनहि जी मेल्यागत स्थिति होते तशी स्थिति या सदैव आनदी असणाऱ्या फुलपाखराची होते का असा प्रश्न ते विचारीत आहेत. मनुष्याच्या जीवनातील विषाद आणि फुलपाखराच्या जीवनातला आनंद यातील विरोध तें स्पष्ट करीत आहेत. अर्थात् या काव्याचा आस्वाद केवळ कल्पनारम्य काव्य म्हणूनच घ्यावयाचा.

२५ ...३७ व ३८ केशवसुताच्या या दोन ओळी अवतरण म्हणून अनेकदा दृष्टीस पडतात. कवीच्या काव्यसृष्टीला सुदर वस्तूच्या विषयाचा कसा वेध असतो तें यात थोडक्यात सागितलें आहे.

.. ... ४० एकांतप्रिय व अबोल केशवसुताच्या मनाची ठेवणच उदास होती असें दिसतें.

## ८. आम्ही कोण ?

सुनीत.

कवीच्या उच्चतर कर्तव्याची जाणीव असल्यामुळें केशवसुतानीं या सुनीतात कवीच्या कर्तृत्वाचें थोड्याच परतु निवडक शब्दात मोठें जोमदार

वर्णन केलें आहे. त्यात इतरेजनांचा ‘ फोले पाखडणारे ’ असा थोडाफार अधिक्षेप असला, तरी तो निर्हेतुक आहे त्यामुळें काव्याची परिणाम-कारकता अधिक वाढली आहे या काव्यातील विचार तेजस्वी असून भाषा ओजस्वी आहे. केशवसुताच्या वृत्तींत एकतऱ्हेची बेपर्वाई व धिटाई होती. त्यामुळे या कवितेस दर्पाचा थोडाफार दर्प येतो असें वाटतें खरे. परंतु कविता स्वतः केशवसुतासबधीं नसून एकंदर कवींच्यासबधीं,–विशेषतः वाल्मीकि, व्यास, होमर, शेक्सपिअर सारख्या कवींसबधीं आहे हें लक्षात घेतले पाहिजे आणि त्याच्या कार्याचा एकदर जगावर प्रभाव पडला आहे हें कबूल केलें पाहिजे. केशवसुताचे हेंच एक सॉनेट शेक्सपिरिअन पद्धतीचे आहे ‘ गेली ज्योति विझोनिया ’ या ताब्याच्या शेक्सपिरिअन सॉनेटची मुक्तकठाने स्तुति केल्यावर त्यानीं हें सुनीत रचले आहे हा इतिहास दृष्टिआड होऊ देता कामा नये

पृ० २५ ओ० ३ **लीलया**–मजेनें.

. ... १२ **शरण्य**–संरक्षण, आधार.

**मंगल**–कल्याण

### ४. माधवानुज. ( १८७२–१९१६ )

माधवानुजाचे सबध नाव काशीनाथ हरि मोडक. त्याचा जन्म सुवा-गड तालुक्यात पडधवली या गावीं १६ मार्च १८७२ ला झाला या ठिकाणीं मराठी ४ इयत्ता पूर्ण झाल्यावर ते पुढील शिक्षणासाठीं रोहे येथें आपल्या मामाकडे राहिले. त्याचे मामा व्यवसायानें शिक्षक असून चागले व्युत्पन्न, कलाप्रेमी व विद्याव्यासंगी होते. माधवानुजाचे ज्येष्ठ बधु माधव हरि मोडक हेच त्याच्या गावातले पहिले ग्रॅज्युएट होते. ते अतिशय बुद्धिमान व महत्त्वाकाक्षी होते. त्याना कविता रचण्याचा नाद होता. तेव्हा बहुश्रुत मातुल व रसिक ज्येष्ठ बंधु याच्या सान्निध्यात माधवा-जनुाच्या प्रतिभेचा उन्मेष झाला.

१८८७ पासून पुढें माधवानुजाचें इंग्रजी शिक्षण पुण्यास न्यू इंग्लिश स्कूलमध्यें झालें. १८८९ व ९० या दोन वर्षीं ते मॅट्रिकला बसले. परतु गणितात गति नसल्यामुळें ते यशस्वी झाले नाहींत. तेव्हा मॅट्रिकचा नाद सोडून ते बी. जे. मेडिकल स्कूलमध्यें प्रविष्ट झाले. आणि तेथूनच १८९४ च्या नोव्हेंबरमध्यें हॉस्पिटल असिस्टटची परीक्षा पास झाले

डिसेंबर १८९४ मध्यें माधवानुजाची नेमणूक ठाणें येथे सिव्हिल हॉस्पिटलवर झाली. त्यावेळीं तेथे इदिरा काव्याचे कर्ते कर्नल कीर्तिकर सिव्हिल सर्जन होते. त्याच्या साहचर्यात माधवनुजाचा सवडीचा काळ काव्यशास्त्रविनोदात व्यतीत झाला. किरात, केशवसुत व अनततनय हे माधवनुजाचे निकटवर्ती स्नेही होते केशवसुताच्या सहवासाचा एक परिणाम असा कीं, त्याच्याप्रमाणेंच माधवनुजानीं अमेरिकन कवि व तत्त्वज्ञ इमर्सन याचा अभ्यास केला, आणि त्याच्या quatrains च्या धाटणीवर केशवसुतानीं जशा ‘ पद्यपाक्ति ’ रचल्या, तशाच त्या माधवानुजानींहि रचल्या. केशवसुताच्या पद्यपक्ति २३ मे १८९६ रोजीं व माधवानुजाच्या पद्यपक्ति १८ ऑगस्ट १८९६ रोजीं रचलेल्या आहेत. केशवसुतानीं नव्यानेंच प्रवर्तित केलेल्या सॉनेट या काव्यप्रकाराला साहाय्य म्हणून माधवनुजानीं सुनीतें लिहिलीं आहेत. त्यातील ‘ जादूच्या प्रभावा ’चें केशवसुताच्या ‘ क्षणात नाहींसे होणाऱ्या भासा ’शीं पुष्कळच साम्य आहे.

माधवानुजाच्या पिढींतले बहुतेक कवि व्यवसायानें शिक्षक होते. त्या पूर्वींचे कीर्तिकर व त्या पिढींतले माधवानुज हेच काय ते व्यवसायानें डाक्टर असणारे कवि होते. जबाबदारीची सरकारी नोकरी आणि अविश्रात डॉक्टरीचा व्यवसाय यामुळें त्याना स्वतःच्या प्रकृतीकडे दुर्लक्ष करून निरनिराळ्या रोगग्रस्त विभागात आणि दुष्काळपीडित प्रातात पायीं प्रवास करावा लागला. माधवानुजाचा स्वभाव कोमल आणि करुण होता. त्यानीं दुष्काळ व रोगराई या हृदयद्रावक प्रसगावर जवळ जवळ दहा कविता लिहिल्या आहेत.

सरकारी नोकरी कंटाळवाणी, दगदगीची आणि त्रासाची झाल्यामुळें माधवानुजानीं तिचा राजिनामा दिला. आणि कल्याणला दवाखाना काढून

स्वतंत्र उद्योग आरंभिला. परंतु जाचक झालेल्या नोकरीमुळें त्याची शरीर-प्रकृति क्षीण झाली होती. तिला विश्रांती मिळावी म्हणून ते १८९९ च्या सुमारास काहीं काळ आपले वडील बंधु माधवराव यांच्याकडे अलाहाबादला जाऊन राहिले होते. या बंधूविषयीं माधवानुजांना अत्यंत आदर असल्या-मुळेंच त्यांनीं माधवानुज हें काव्यनाम धारण केलें होतें. याच सुमारास माधवानुजांनीं बंगाली भाषा व साहित्य यांचा अभ्यास केला. त्यांनीं कृष्णाकांतेर उइल, दुर्गेशनंदिनी व कपालकुंडला या बंकिमचंद्रांच्या काद-बऱ्यांचीं, मायकेल मधुसूदन दत्त यांच्या मेघनादवधाचें आणि टागोरांच्या गीतांजलींतील काहीं गीतांचीं भाषांतरें केलीं आहेत तींच तेवढीं समोर ठेवून माधवानुजांची कविता भाषांतरित आहे असा आरोप करणे बरोबर ठरणार नाहीं. या भाषांतरित कवितांच्या प्रमाणांत माधवानुजांची स्वतंत्र कविता अधिक भरेल.

कल्याणला स्वतंत्र धंदा सुरू केल्यानंतर देखील माधवानुजांना फारसा आराम मिळाला नाहीं. दरसालची प्लेगची फेरी, त्यामुळें करावें लागणारें स्थलांतर, धंद्याची दगदग व ढासळलेल्या प्रकृतीमुळे होणारे शरीरकष्ट— या त्रासांनीं त्यांना फार सतावलें. १९१५ सालच्या एप्रिलपासून तर त्यांची प्रकृति फारच खालावली आणि नंतर जवळ जवळ एक वर्षानें म्हणजे २ मार्च १९१६ रोजीं त्यांचा अंत झाला.

माधवानुजांच्या मनोरचनेचा त्यांच्या कवितांकृतींवर फार मोठा परि-णाम झाला आहे. लोकेषणा हें त्यांचें साध्य नव्हतें. आत्मनिरीक्षण, शुद्ध अंतःकरण, सहनशीलपण आणि करुणपण या गुणांचें त्यांनीं संगोपन केलें होतें. त्यामुळें त्यांच्या कवितांत शालीनता, ऋजुता व कोमलता यांचें दर्शन होतें. त्यांचे विचार मवाळ असले तरी निर्मळ होते आणि म्हणू-नच त्यांची वाणी सरळ, साधीसुधी व सुबोध आहे कवितेला उपदेशाचें व तात्पर्याचें वावडें असतें असा कलापक्ष आहे. परंतु प्रत्येक वस्तूकडे सहानु-भूतीनें पाहणाऱ्या माधवानुजांनीं हें बिकट कार्यहि सहजतेनें व सुंदरतेने पार पाडलें आहे.

# माधवानुजांचें काव्यवाङ्मय.

## १. माधवानुज.

### १. बर्न्सकवि

वृत्त-शार्दूलविक्रीडित.

रॉबर्ट बर्न्स हा स्कॉच लोकाचा राष्ट्रीय कवि खराखुरा शेतकरी होता. एकदा हा शेत नागरत असताना एका बिळातून एक उदीर बाहेर पडला. त्यावर देखील याने एक सरस कविता लिहिली आहे. याची कविता सरळ, साधी व सुदर आहे तिच्यातले मनोलेखन इतके मन वेधते कीं जणू नजरबदीचा प्रयोग व्हावा याच्या कवितेत विशेष विचार नसताना, याची विशिष्ट अशी लेखनशैली नसताना आणि याच्या लेखनात भाषेचे व छद शास्त्राचे अनेक दोष असतानाहि केवळ भावनोत्कटतेमुळे याची कृति रसिकात प्रिय झाली आहे. १७५९ ते १७९६ हा या कवीचा काळ होय.

माधवानुजानीं ज्या सुमारास कवितालेखनास प्रारभ केला त्या सुमारास आधुनिक मराठी कवितेच्या क्षेत्रात वर्डस्वर्थ, बर्न्स, स्कॉट इत्यादिकाच्या कवितांप्रमाणें कवितेतलें कथन हें साधे, सरळ व सोपे असावे, मनुष्याच्या निरनिराळ्या विकाराचे चित्रलेखन करावे आणि निसर्ग हा जात्याच सुदर म्हणून त्याचे अनुकरण करावे अशा प्रकारची विचारसरणी प्रसृत होत होती प्रस्तुत कविता ही त्या विचारसरणीचें फळ आहे.

पृ. २६ ओ. ४ **वात्सल्य** म्हणजे वस्तुत: मुलावरील प्रेम. परंतु येथे आत्मीयता, आपलेपणा असा अर्थ घ्यावयाचा

... १३ व १७ बर्न्स स्वतः शेतकरी होता. त्याची उदरावरील कविता

... २७ ... २० अर्थांतरन्यास.

... ... २१ **पर्णकुटी** अर्थात् बर्न्स शेतकरी असल्यामुळे त्याची राहण्याची जी झोपडी होती ती.

.. ... २७ **विषय**–भूप्रदेश.

... ... २८ **जन्मदा भूमि**–स्कॉटलड. बर्न्स तेथला.

## २ दगड फोडतांना

१८९७ च्या दुष्काळात गरिबाना अन्न देऊन सार्वजनिक कामें करून घेत. माधवानुज फिरतीवर असताना खडी फोडणारी एक अशक्त व त्रस्त स्त्री त्यानीं पाहिली त्या प्रसगाने त्याना टॉमस हूडची 'दी सॉग ऑफ् दी शर्ट' ही कविता आठवली असावी तिच्यातील 'Stitch-Stitch-Stitch!' किवा Work-Work-Work' या ओळींच्या नमुन्यावर त्यानीं 'फुट्-फुट्-फुट्' किवा 'कुट्-कुट्-कुट्' अशी रचना केली आहे. ती नादानुकारी, अर्थपूर्ण व परिणामकारक आहे

पृ. २८ ओ ९, १०, १७ व १८. यातील कल्पना करुणरसाला पोषक आहेत.

... २३ ते २६ यात उमेद खचलेली दाखविली नाही हें विशेष आहे.

## ३. कृष्णाकोयनांचा संगम

हा सुदर सगम सातारा जिल्ह्यात आहे. माधवानुजाचें हें गीत त्यातील स्वाभाविक भाषाविष्करणामुळे आणि साध्या गोड चालीमुळे एकेकाळीं अखिल महाराष्ट्रात घरोघर पसरले होते.

पृ. २९ ओ ६ **सिकता** — वाळू.

... ... ७ माधवानुजाचा तात्पर्य काढण्याचा स्वभाव.

... ... १० **झष** —मासे.

... ... १२ **भवजल** —ससारावर सरोवराचें अथवा सागराचे रूपक.

... ३० ... २१ **अघ** —पाप.

४. दीपविसर्जन.

पळसाच्या द्रोणात फुलाच्या पाकळ्या पसरून त्यात कणकेचा दिवा उजळावयाचा आणि त्यानें पुण्यपावन नदीला आरती ओवाळून मग तो द्रोण दिव्यासह नदीच्या प्रवाहात सोडावयाचा ही या देशात प्राचीन प्रथा आहे सायकाळी हे दृश्य फारच सुदर दिसतें. तीर्थें, क्षेत्रे, सरितासगम, वनस्पति इत्यादि निसर्गरमणीय दृश्ये पाहून माधवानुजाचे अतःकरण आनदानें उचबळून येत असे तीं त्याना प्रसन्नतेची, पावनतेचीं आणि शातीचीं द्योतकें वाटत अशाच एका प्रसगावर त्याना ही कविता उत्स्फूर्त झाली आहे. विषय वेचण्यात माधवानुजाची अभिरुचि कशी उच्च प्रतीची होती आणि सौदर्यशोधनात दृष्टि किती सूक्ष्म होती तें या कवितेवरून लक्षात येईल. ही कविता श्रीपाद कृष्ण कोल्हटकरासारख्या रसिकाना इतकी काही आवडली की, त्यानीं या कवितेचे निर्माते म्हणून माधवानुजाना कडकडून मिठी मारली.

**दीपविसर्जन** म्हणजे दिवे सोडणे.

पृ० ३० ओ० ६ **मदीय + ईक्षणांचीं**—माझ्या डोळ्याची.

... ... ७ **अंशुमाली**—सूर्य.

... ८ **यामिनी**—रात्र.

... ... १० **अंतराल**—आकाश.

... . ११ **तर्ती**—राग.

... ... १२ उत्प्रेक्षा.

... ३१. १३ते१६ आकाश आणि नदीचा प्रवाह यातील साम्य चद्रकोर व नौका आणि मेघखड व वीचि म्हणजे तरग याच्या उपमानी दाखविलें आहे. कल्पनात नावीन्य किंवा नटवेपणा नसला तरी सौहार्द आहे.

.. ३१ २९ते३२ सार काढण्याची माधवानुजाची नेहमींची पद्धति.

... ३२ .. ३९ अर्थांतरन्यास.

... ... ४३ **दीपसर्गप्रसंग** माधवानुजांना **उत्सर्ग** म्हणावयाचें आहे. उत्सर्ग म्हणजे दान किंवा त्याग. अर्थात् दीप-दानाचा किंवा दीप सोडण्याचा प्रसंग.

## ५. स्मशानगीत.

इंग्रजी वाङ्मयाच्या संपर्कानें अर्वाचीन मराठी कवितेत Elegy म्हणजे विलापिका हा काव्यप्रकार आला. विलापिकेतील दुःख आत्मीय असावें आणि त्याचा शेवट तत्त्वचिंतनात व्हावा असा संकेत आहे. तो सर्व विलापिकात तंतोतंत पाळण्यात येतोच असें नाहीं प्रस्तुत विलापिका माधवानुजानीं एका लहान मृत बालकास अनुलक्षून लिहिली आहे. करुण रसाचें आविष्करण माधवानुजाना सहज साधे. तसे तें यात आहे. पाचव्या कडव्यात अल्प चिंतनहि आहे.

पृ. ३३ ओ. १८ मरुत्—वारा.

## ६. गीतांजलि

वृत्त—भूपतिवैभव.

विश्वकवि रवींद्रनाथ टागोराच्या गीताजलींतील पहिल्या गीताचा मूळ बंगालीवरून केलेला हा अनुवाद आहे. ही कविता गूढवादी असली, तरी सूचक आहे जगाच्या बगीच्यात जीवाचे फूल फुलले आहे. आयुष्याचा दिवस म्हणजे तारुण्य सरले आहे. आयुष्याची संध्या म्हणजे वार्धक्य समोर आहे फूल सुवासयुक्त किंवा मनोहर नाहीं म्हणजे जीवाच्या ठिकाणीं काही सद्‌गुण नाहीत. परंतु जीवाला ईश्वराच्या सेवेची इच्छा आहे. तेव्हा त्यानेंच आपल्या हाताने हें तोडावे म्हणजे शेवटची मुक्ति द्यावी. माधवानुजाच्या शांत व गंभीर प्रकृतीला साजेसाच हा अनुवाद आहे.

## ५. चंद्रशेखर ( १८७१-१९३७ )

चंद्रशेखराचे संपूर्ण नाव चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे. त्याचें घराणे नाशकाचें. तेथेंच २९ जानेवारी १८७१ ला त्याचा जन्म झाला. त्याचें

मराठी शिक्षण गावठी शाळेत झालें. आणि इग्रजी शिक्षण नाशिक, बडोर्दे व पुणे येथील हायस्कुलातून झालें. गणित विषय कच्चा असल्यामुळें ते मॅट्रिक होऊ शकले नाहींत. नतर त्यानीं धदेशिक्षण घेण्याचा प्रयत्न केला. पण त्यात त्याना यश आले नाहीं. शेवटीं ते बडोद्यास चीफ मेडिकल ऑफिसच्या कचेरींत कायमचे कारकून झाले. तथे त्यानी ३४ वर्षें नौकरी केली व मग सेवानिवृत्त झाले. अखेरच्या दिवसात सयाजीराव महाराज गायकवाडानी त्याना राजकविपद देऊन गौरविलें होतें.

चद्रशेखराचा दत्ताशीं अकृत्रिम स्नेहसबध होता. दत्ताच्या अपमृत्यूमुळे त्याना जबरदस्त धक्का बसला चद्रशेखराची पहिली कविता १८९५ सालीं करमणुकींत प्रसिद्ध झाली होती. त्यानतर तीन तपे त्याचे काव्यलेखन अखड चालू होते

राजकविपदाची प्राप्ति झाल्यावर चद्रशेखर फार काळ जिवंत राहिले नाहींत. वार्धक्यात त्याना काळपुळी झाली. आणि त्या आजारानेच १७ मार्च १९३७ रोजी त्याचा बडोदे येथे अत झाला.

चद्रशेखरानीं प्राचीन परपरा कायम राखूनहि अर्वाचीन अभिनव अभिरुचीलाहि रुचेल अशी सरस व सपन्न कृति निर्माण केली आहे त्याची वृत्ति आत्मनिरपेक्ष होती. त्यामुळे त्यानीं व्यक्तिगत अशा क्षुद्र भावनेचे आणि क्षुल्लक विचाराचे आपल्या काव्यात स्तोम माजू दिलें नाहीं. त्याच्या कवितेत अहवाद व अतर्मुखता नाहीं. परतु वर्णनाची वेधकता आणि कथनाची कलाकुशलता आहे त्याची रचनाचातुरीहि अप्रतिम आहे. या तीन बाबतींत त्याचा हात धरणारा दुसरा कुणी कवि नाहीं. पुन्हा औचित्यविचार आणि आवश्यक सयम या दोन गुणाच्या अवलबनामुळे त्याचे काव्य कुठेहि कटाळवाणे झालेले नाहीं.

चंद्रशेखराचे सारे आयुष्य आपल्या व्यवसायात आणि सवडीच्या वेळीं उपासिलेल्या कवितालेखनात व्यतीत झालें. त्याच्या मनावर उज्ज्वल, उदात्त व उदार वाङ्मयाचे सस्कार झाले होते. त्याच्या अनेक कविताना सस्कृत व इग्रजी साहित्यातील अभिजात कृतींचा आधार आहे. त्याच्या

ंवितार्चे स्वरुप भाषातराचें नसून रूपातराचे किंवा अनुवादाचें आहे. गाणि हें स्वरूप इतकें विलोभनीय व आकर्षक आहे कीं, त्याचें मूळ अन्यत्र मसावे हें चुकूनहि लक्षात येत नाहीं. चद्रशेखराची रूपातराची हातोटी मालूम व अनन्यसाधारण होती

चद्रशेखर १ मार्च १९०७ सालीं जळगावास भरलेल्या पहिल्या कवि-समेलनात उपस्थित होते. त्यानतर २० आक्टोबर १९२९ रोजीं मुबई उपनगर जिल्हा साहित्यसभेच्या वतीने विलेपार्ले येथे समेलन भरले होते, त्याचे ते अध्यक्ष होते आपल्या अध्यक्षीय भाषणात पुढील विचार त्यानीं माडला आहे—'मोहक वस्तूचीं वर्णने आणि ससारात गुरफटून टाकणारे मनोभाव गोड तालसुरात मजेदार चुटक्यातून गाइल्यानें तुमची वाहवा-बोलबाला होईल, पण ती टेम्यावर उधळलेल्या राळेच्या भपक्याप्रमाणें क्षणिक असणार'.... त्यावरून त्याच्या काव्याच्या स्वरूपावर सहज प्रकाश पडेल

## चंद्रशेखरांचें काव्यवाङ्मय.

१ चद्रिका. २ उघडऽ गुपित. ३ किस्मतपुरचा जमीनदार.

### १. कविवर्य लेंभे यांची कविता

वृत्त—शार्दूलविक्रीडित.

'She moves a goddess, she looks a queen' या होमरच्या कल्पनेचा या कवितेस नाममात्र आधार आहे. चद्रशेखराच्या पूर्वीच्या पिढींत विठ्ठल भगवत लेंभे हे प्रसिद्ध कवि होते. १८५० ते १९२० हा त्याचा काळ. त्यानीं सुरतरगिणी, आनदकद व शोकावर्त हीं खडकाव्ये रचलीं आहेत. यापैकीं शेवटचें काव्य मृतपत्नीवरील विलापिका आहे. लेंभ्याची रचना डौलदार आणि भाषा मधुर असे. त्यांच्या कवितेला अनुलक्षून चंद्रशेखरानी ही कविता लिहिली आहे.

पृ. ३५ ओ. १ ते ३ लेंम्यांची कविता वाचण्याच्या आतुरतेचें काव्यमय वर्णन.

... ... ......४ सहज सुदर उत्प्रेक्षा. शारदीय सकाळ उल्हसित व उत्साहित असते.

... ... ......५ हंसाचे......दार्विति—हसाच्या डौलदार चालीचे अनुकरण.

पदन्यास—पदाची म्हणजे कवितेच्या चरणाची रचना किवा ठेवण.

... ... ......८ चित्तच लेंम्याच्या कवितेतील आकर्षणाने चुंबक बनतें हा भाव.

.. ....९ व १० लेंम्याच्या कवितेतील ओळी या झुळुकीहून अधिक सुखदायक आहेत. व्यतिरेक व प्रश्न.

......१५ व १६ यात कल्पना नाहींत. भावना आहेत.

... ... .....१८ शिराणी—उत्सव, आनंद, हौस पूर्ण होणे, समाधान.

पृ.३९ओ.२१ते२४ चंद्रशेखराचा इतर कवीबद्दल आदर. त्याचा निर्मत्सर व निर्मळ स्वभाव.

## २. रंगराव हर्षे

मिल्टनच्या L'Allegro आणि Il' Penseroso या दोन प्रसिद्ध काव्याचीं चद्रशेखरानीं रगराव हर्षे आणि चितोपत उदास हीं दोन रूपातरें केलीं आहेत. रगेलपणा आणि उदासीनता या ज्या दोन सहज प्रवृत्ति, त्याचे दोन प्रतिनिधि मिल्टननें आपल्या दिव्य प्रतिभेनें घडवले आहेत. त्याना चंद्रशेखरांनी इतका बेमालुम मराठी मुलामा दिला आहे कीं, ते मूळचे परके असावेत असें वाटतहि नाहीं. यापैकीं 'रगराव हर्षे' मधील काही ओळी येथें घेतल्या आहेत. But come, thou Goddess fair and free . And by men, heart-easing Mirth इत्यादि मूळ इंग्रजीशीं मराठी पक्ति पडताळून पाहिल्या म्हणजे चद्रशेखराची रूपातर-

चातुरी नीट लक्षांत येते. उपर्युक्त दोन वृत्ति वेगवेगळ्या असल्या, आणि त्या एकत्र राहू शकत नाहींत असें वाटलें, तरी वस्तुतः, त्याचीं बीजे प्रत्येक माणसात असतात. या दोन्ही वृत्ति क्रियापर आहेत. मात्र रगेलपणा हा उथळ व बहिर्मुख, तर उदासीनता ही खोल व अतर्मुख असते. पहिल्या वृत्तींत खरें सुख नाहीं, तर दुसरी ही आदरणीय व हितकर म्हणून स्वीकरणीय आहे. पहिल्या २२ ओळींत हर्षाला कारणीभूत होणाऱ्या गुणाचीं नावे व चुटपुटतीं वर्णनें आहेत.

पृ० ३६ ओ० ५व६ वक्रोक्ति, व्याजोक्ति, व्याजस्तुति व श्लेष हे विनोदास पोषक अलकार आहेत.

...३७ ओ० २० **परिचारकगण**–सेवकजन.

पुढे ५६ व्या ओळीपर्यत तऱ्हेतऱ्हेच्या वेषभूषाचें हुबेहूब वर्णन आहे. हे सर्व पेहेराव रगेलपणाचे दर्शक आहेत.

पृ. ३८ ओ.३९ते४४ यात चद्रशेखराचा सूक्ष्म विनोद आणि मार्मिक टीका आहे.

पुढे १०० व्या ओळीपर्यत मजलशीचे आणि तिच्यातील रगेल सभासदाचें विनोदपूर्ण वर्णन आहे.

पृ.३९ ओ.६९व७० होनाजी, सगनभाऊ व रामजोशी याच्या लावण्या.

४०ओ.८१ते ९० हे विनोदपूर्ण रगेल लोकाचें वर्णन आहे.

.. ओ.९९व१०० यात मनुष्यस्वभावाचे मार्मिक दर्शन आहे.

## ३ गगाद्वारी भजन

चद्रशेखराच्या 'गोदागौरव' या अपूर्ण काव्यातील हा एक पूर्ण उतारा आहे. यात गोदावरीचा महिमा गाइला आहे. त्यात कवीचे हार्द उतरलें आहे. कवितेला आचार्याच्या चर्पटपजरीची चाल योजली आहे. तिच्यातील भावगभीर कल्पना पुण्यपावन आहेत आणि भाषा मधुर आहे.

पृ. ४१ ओ. २ 'सोऽहं मंत्र— मी 'तोच आहें' ही आत्मस्वरूपाची जाणीव. तिचा मंत्र.

... ... ......३ स्वानंदी—ब्रह्मानंदात.

... ... . ...४ भंग—भाग ( हिंदी शब्द )

...४२ ३१ ते ४० गोदावरीच्या उगमाजवळील गंगाद्वारापाशीं जे शीतल वातावरण आहे ते येथें शब्दात साकार केले आहे.

.. ४३......६४ पुनरपि मरणं—हा चरण आचार्यांच्या चर्पटपंजरींतील आहे.

चंद्रशेखराच्या मनावर झालेले जुन्या सांस्कृतिक वातावरणाचे संस्कार आणि जे जें पुण्यपावन असेल, त्या त्या विषयींचा त्यांचा आदरभाव यात प्रकट झाला आहे.

### ४ कारंज.

वृत्त—बालानंद.

James Russel Lowel च्या Fountain चे हें भाषांतर आहे. चंद्रशेखरांना नवीन प्रकारची कविताहि प्रिय होती त्याचें हें उत्तम उदाहरण आहे. चाल नवीन प्रकारची आहे. कवितेचे रूपहि नवीन आहे. आतील कल्पनांचा प्रकार देखील नवीन आहे. मात्र अखेरचें चिंतन थोडेंफार जुन्या पद्धतीचे आहे. कदाचित् त्यामुळेंहि चंद्रशेखरांना ही कविता आवडली असावी. आणि त्यांनीं तिचे भाषांतर केलें असावें.

### ६ विनायक ( १८७२—१९०९ ).

विनायकाचे पूर्ण नाव विनायक जनार्दन करंदीकर. १५ सप्टेंबर १८७२ रोजीं धुळे येथें त्यांचा जन्म झाला. त्यांचें प्राथमिक मराठी शिक्षण आणि स्कूलफायनलपर्यंतचें इंग्रजी शिक्षण तेथेंच झालें. त्या परीक्षेला आवश्यक असलेल्या गणित या विषयाशिवाय विनायकांना अगणित विषय येत असल्यामुळें त्यांचें शिक्षण येथेंच पूर्णविराम पावलें. त्यांचे वडीलबंधु बळवंत

हे नामवंत कवि होते. त्याच्याकडून विनायकाना कवितालेखनाचा ओनामा मिळाला.

विनायकाना आयुष्यात स्थैर्य असे कधींच लाभलें नाहीं. शिक्षण थाबल्यावर आरभीं त्याना पोलिसखात्यात नोकरी धरली परतु तेथे काहीं बालट आल्यामुळे त्याना काहीं काळ फरारी व्हावें लागले. पुढें ते काहीं दिवस धरणगावच्या मिशनमधील स्त्रियाना शिकवायला मराठी पडित म्हणून राहिले परतु येथेंहि त्याचे वास्तव्य अल्पकाळच टिकलें शेवटीं ते सावद्याचे श्रीमत जहागिरदार अण्णासाहेब गभीरराव देशमुख याच्या वडिलापाशीं काहीं काळ राहिले परतु त्याच्या स्वतत्र प्रकृतीला तेथील वातावरण फार दिवस मानवलें नाहीं तेथूनहि त्यानीं लवकरच काढता पाय घेतला

विनायकाची बुद्धिमत्ता तीव्र होती आणि हृदय अतिशय भावनामय होते. परतु त्याच्या आयुष्याचा बराच काळ व्यसनाधीनतेत आणि अकारण भटकण्यात गेला. टिळक व केशवसुत याच्याप्रमाणे आधुनिक मराठी कवितेला नवे वळण लावण्याचें श्रेय विनायकानाहि आहे टिळकाचा धर्म-विचाराकडे, केशवसुताचा समाजसुधारणेकडे तर विनायकाचा ओढा राष्ट्रवादाकडे होता. टिळकाचे ‘ केसरी ’ पत्र विनायकाचें आवडते होतें. त्याकाळच्या पारतत्र्यात राजकारणविषयक कविता उघड उघड लिहिता येणे शक्य नव्हतें तेव्हा रूपकाच्या भाषेने किवा पर्यायोक्तीने विनायकानीं त्यासबधींचे आपले भाव प्रकट केले आहेत. विनायक आपल्या युगाचे प्रतिनिधि आहेत. त्याच्या हयातींत ज्या ज्या प्रमुख राजकीय घटना घडल्या त्या त्या घटनाचे उठावदार प्रतिबिंब त्याच्या कवितेंत उमटले आहे.

विनायकापाशीं जसें भावविवश कवीचे तसेंच कलाकुशल नाटककाराचे अतःकरण होतें. ध्यास तो भास, वीरमती, मोहानतर आणि गणिकोद्धार या कथाकवितात त्याच्यातील थोर कलावताची ओळख पटते. निवडक प्रसग, त्याची कौशल्यपूर्ण गुफण, वेधक वर्णनशैली, ठळक शब्दचित्रे आणि भावानुगामी भाषा या गुणसमुच्चयामुळें त्याचीं हीं कथाकाव्ये हृदयगम झालीं आहेत.

विनायकानीं प्रभावती या नांवाचे एक राजकीय विचाराचें प्रभावशाली नाटक लिहिलें होतें. तें त्याच्या पश्चात् नाट्यकलाप्रवर्तक मडळीनें रग-भूमीवर आणलें. तें बसविण्यासाठीं ते धुळ्याहून पुण्याला गेले असताना त्याना पाच सहा दिवसातच तापानें पछाडले आणि त्यातच त्यांचा ३०-९-१९०९ रोजीं शेवट झाला.

राष्ट्रप्रीति हा विनायकाच्या कवितेंतला सर्वांत मोठा गुण आहे. पार-तन्त्र्यामुळें त्याच्या अतःकरणाला शतशः वेदना होत. तेंव्हा आपला देश व आपले देशबाधव हे स्वतत्र व सुखी व्हावेत या हेतूनें त्याना अनेक कविता स्फुरल्या आहेत. या कविता म्हणताना त्यानीं कित्येकदा राज्य-कर्त्यांवर तर कित्येकदा स्वजनाच्या अवगुणावर प्रखर टीका केली आहे.

विनायकाचा स्वभाव स्वच्छदी आणि वृत्ति आनदी, आशावादी व विनोदी होती त्याच्या कवितेवर या त्याच्या गुणविशेषाची छाया पडली आहे. त्याच्या लेखणींत प्रसाद आहे आणि वाणींत प्रवाह आहे. त्यामुळें त्याचीं काव्ये अनेकाच्या तोंडीं बसलीं आहेत.

## विनायकांचें वाङ्मय

### १ विनायकाची कविता.

#### १ हतभागिनी

चाल–कधि करिती लग्न माझें.

मासिकमनोरजनाच्या मलपृष्ठावर दुर्दैवी हिंदमाता विलाप करीत आहे, आणि तिच्या आसपास जहाल, मवाळ, हिंदु, मुसलमान इत्यादि पक्षोप-पक्ष परस्परात मारामाऱ्या करीत आहेत असे चित्र आलें होतें. तें पाहून विनायकाना ही कविता उत्स्फूर्त झाली.

हतभागिनी म्हणजे दुर्दैवी हिंदमाता. आरभींच्या ४ कडव्यात दास्य, दैन्य व दारिद्य या तिच्या दारुण दुःखाचें कारुण्यपूर्ण वर्णन आहे. ५ व्या

कडव्यात तिला वैभवाच्या शिखरावर बसविणाऱ्या वीरपुत्राचा प्राचीन इतिहास आहे. ६ व्या व ७ व्या कडव्यात पक्षोपपक्षांच्या कलहावर जळजळीत टीका आहे. आणि शेवटच्या कडव्यात निराशेचा सुस्कारा आहे. 'प्रजा हाच कीं वत्स भूधेनुकेचा' या चरणावरून ८ व्या कडव्यातील गाईची कल्पना सुचली असावी.

## २ विरही.

चाल— कधि करिती लग्न माझे.

हें एक विप्रलभात्मक प्रणयपर भावगीत आहे. कवितेत भावना आणि तीहि वैणिक असावी, ही जी त्या काळीं नवी कल्पना कवितेच्या क्षेत्रात प्रसृत होत होती तिचे हे गीत उदाहरण आहे. तें आत्मपर आहे असे वाटते. पहिल्या दोन कडव्यात मनोलेखन आहे. तिसऱ्यात प्रियेचे वर्णन आहे. चवथ्यात व पाचव्यात तिचें स्मरण आहे. सहाव्यात व सातव्यात मनोमय स्वप्न आहे. त्यातील चिंतनाच्या दोल्यावर मन झोके घेऊं लागले आणि मी भुंगा असतो तर वाऱ्याच्या वाहनावर बसून तुझ्याकडे आलो असतों आणि तुला भेटलो असतों या कल्पना काव्यदृष्ट्या रमणीय व स्मरणीय आहेत. प्रियेला ' वनमाले ! ' हे सबोधन दिले आहे ते काव्यमय नाही असे कोण म्हणेल ? आठव्या कडव्यात ध्यानसमाधीचा भग व चुटपुटती निराशा आहे.

## ३. सोंगटीचा खेळ.

जाति—भूपाळी.

परतत्रतेत तत्कालीन राजकीय परिस्थितीवर उघडपणे कविता लिहिणें अशक्य असल्यामुळें १९०६ च्या रूसोजपानी युद्धावरील ही कविता सोंगटीच्या पाघरुणाआड लिहिली आहे. आणि अधूनमधून अध्यात्मातील भाषा योजिली आहे. चवथ्या कडव्यात सूचकता आहे. हिरवी सोंगटी म्हणजे रशिया, पिवळी जपान, लाल ग्रेटब्रिटन आणि, काळी

म्हणजे हिंदुस्थान. पाचव्या कडव्यात ग्रेटब्रिटनचा आक्रमक स्वभाव दाखवला आहे. सातव्या कडव्यात कवीचा आशावाद प्रकट झाला आहे.

## ४ प्रोफेसर छत्र्यांचा केसरी

जाति—अक्रूर.

मूळ तासगावकडील असणारे विष्णु मोरेश्वर छत्रे यानीं प्रथम महाराष्ट्रात सर्कशीचा धदा चालवला. त्याच्या सर्कशीतील आवडाबाई या नावाची नटी सिंहाशीं वाटेल तो खेळ खेळावयाची. प्रोफेसर छत्र्याच्या सर्कशीत स्वतंत्र केसरी अशा रीतीनें परतंत्र झालेला पाहून विनायकाचे स्वतंत्र अंतःकरण उद्विग्न झाले. त्यात त्याना स्वतःच्या परतंत्र देशाची पडछाया दिसली. तेव्हा सर्कशीतील सिंहाच्या पडद्याआड त्यानीं स्वत्व विसरलेल्या हिंदुस्थानाला उद्देशून हा तेजस्वी विचाराची व ओजस्वी वाणीची कविता लिहिली आणि ती टिळकाच्या केसरींत प्रसिद्ध केली.

पृ ४९ ओ. ३ व ४ यात भारताची थोर प्राचीन विचारपरंपरा आणि पराक्रम याची सूचकता आहे.

... ५० ५ नाग—हत्ती.

............ ९ कपट्याच्या हातीं म्हणजे इंग्लंडच्या तावडींत.

............११ प्रतोदाघात—चाबकाचे फटकारे.

..... भ्रूसी दृकपाता—म्हणजे रिंगमास्टरने नुसता सुस्कारा टाकला किंवा डोळ्याने इशारा केला तरी तुझी घाबरगुंडी उडते. गुलामगिरींत तूं इतका लाचार झाला आहेस.

पृ. ५० ओ. १६ **पाणी**—पराक्रम.

... १७ या ठिकाणीं एक महत्त्वाचे त्रिकालाबाधित सत्य सागितलें आहे.

... १८ व १९ यात आक्रमणशील व अत्याचारी मानवसमाजावर टीका आहे विनायकाना ग्रेट ब्रिटन अभिप्रेत आहे.

## ५. गणेशपूजा.

जाति—भूपाळी

महाराष्ट्रात लोकमान्य टिळकानीं सार्वजनिक गणेशोत्सवाची प्रथा सुरू केली होती. १८९७ मध्ये धुळ्यास प्लेग असल्यामुळे लोक रानात झोपडया बाधून राहात होते तेथेच गणेशोत्सव झाला. त्या सालीं पुण्यास रॅड व आयर्स्ट या दोघा अधिकाऱ्याचे खून पडले होते. सगयावरून टिळकाना अटक झाली होती पुढे चापेकर गुन्हेगार म्हणून फाशीं गेले या साऱ्या घटना विनायकानीं या कवितेत मोठ्या खुबीने गोंवल्या आहेत.

पृ. ५० ओ. १ **रोगें पीडित**—अर्थात् प्लेगनें दूषित.

...५१ ... ६ यावेळी कापडकर वाढला होता त्यावर ही टीका आहे

.. ... ७ यात लोकमान्य टिळकाच्या अनुपस्थितीचा खुबीदार उल्लेख आहे

... ... ९ यात चापेकराचा उल्लेख आहे

... ...११ हा उल्लेख पजाबात एका गोऱ्या अधिकाऱ्याने अत्याचार केला त्यास उद्देशून आहे.

... ...१५ परदेशी मालाच्या बहिष्काराची चळवळ या वेळीं सुरू झाली होती.

## ६. चिंमा

वृत्त—शार्दूलविक्रीडित.

**ही विनोदी कविता चिलमेला उद्देशून आहे. चिमा म्हणजे चिलीम.**

पृ ५२ ओ. १० **चिर**–चिरगूट, चिंधी.
... ...११ **सुकी पानें**–तंबाखू.

७ Bee ( १८७२–१९४७ )

'बी' याचे व्यावहारिक नाव नारायण मुरलीधर गुप्ते याचा जन्म १८७२ मध्ये वऱ्हाडात जिल्हा बुलढाणा गाव मलकापूर येथे झाला. याचे वडील वऱ्हाडात यवतमाळ व वणी येथे वकिली करीत. तेव्हा 'बीं' चे प्राथमिक शिक्षण यवतमाळ येथे आणि पुढील इग्रजी शालेय शिक्षण अमरावतीस झाले. परतु वडिलाच्या आकस्मिक मृत्यूमुळे त्याना ते मॅट्रिक-पार्गीच सोडून सरकारी कोर्टात कारकून व्हावे लागले.

सरकारी नौकरीच्या निमित्ताने 'बीं'ना वाशीम, मूर्तिजापूर, अकोला इत्यादि ठिकाणीं हिंडावे लागले. पण त्याच्या जीवनाचा फार मोठा काल अकोला येथेंच गेला. तेथेंच ते सरकारी नौकरीतून निवृत्त झाले.

वयाच्या १८ व्या वर्षी 'बीं'ना कवितालेखनाची प्रथम स्फूर्ति झाली १८९१ मध्ये करमणुकींत 'प्रणय–पत्रिका' ही त्याची कविता प्रसिद्ध झाली. त्यानतर कांहीं काल ते गद्यलेखन करीत होते. कवि या नात्याने त्याची खरी प्रसिद्धि १९११ च्या जुलैच्या मासिक मनोरजनात 'वेडगाणे' ही कविता आल्यावर झाली. वस्तुतः गोविदाग्रज, बालकवि व रेदाळकर याच्यापेक्षा ते वयाने वडील होते. परतु प्रज्ञेची परिणति झाल्यावर त्यानीं कविता प्रसिद्ध करण्यास प्रारभ केला. त्यामुळे त्याची गणना वयाने कनिष्ठ असणाऱ्या या कवींबरोबर होत असते.

सेवानिवृत्तीनतर 'बी' हे कांहीं काल नागपुरास होते. पुढे ते छिंदवाड्यास गेले. तेथे असताना १९४६ च्या सुमारास त्याच्या प्रतिभेला पुन्हा नव्याने बहर आला होता. मध्यंतरीं वीस बावीस वर्षे स्थगित झालेले कवितालेखन त्यानीं पुन्हा नव्या जोमाने व ताज्या दमाने सुरू केले होतें. परतु वार्धक्यामुळे लवकरच म्हणजे ३०–८–१९४७ रोजीं त्याचा अत झाला.

'बीं'ची कविता तोलानें कमी पण मोलानें भारी आहे. उगीच भराभर व भाराभर त्यानीं लिहिलें नाहीं. वैचारिकता हा त्याच्या कवितेचा आत्मा आहे पुन्हा या वैचारिकतेंत कोठेहि विसवाद, विसगति अथवा विरोध नाही हें विशेष आहे. 'बीं' नीं काही इग्रजी कवितार्ची भाषातरें केलीं आहेत. क्वचित् सस्कृत व इग्रजी साहित्यातील काही विचारावर व कल्पनावर काव्यमय भाष्ये केलीं आहेत. काही कवितातून त्यानीं आपला काव्यासबधींचा दृष्टिकोण व्यक्त केला आहे. काव्याचा आनद हा अपूर्व आहे तो जड अशा बाह्य ज्ञानेद्रियाना आकलन करता येणे शक्य नाहीं. निर्विकल्प होऊन आणि विषयापासून अलिप्त राहून मृदुल अशा मनानेच तो लुटला पाहिजे असे त्याचे मत होते. त्याचा आध्यात्मिक वाङ्मयाचा अभ्यास गाढा होता. त्यामुळें त्याच्या बऱ्याच कवितावर त्या विचाराची छाप पडली आहे. विषय कठिण, शब्द जुन्या मराठी वाङ्मयातून वेचलेले आणि थोडक्यात पुष्कळ अर्थ सागण्याचा प्रयत्न केलेला. त्यामुळे त्याचे काव्य क्वचित् क्लिष्ट झालें आहे.

## 'बीं'चें काव्यवाङ्मय

१. फुलाची ओंजळ आणि पिकले पान.

२ **दीपज्योतीस.**

वृत्त—शार्दूलविक्रीडित.

ही कविता वास्तविक दीपज्योतीला उद्देशून नाही. तिच्या पडद्याआड कवीने सक्तीचे वैधव्य कठिणाऱ्या युवतीला निसर्गाच्या नियमाची जाणीव करून दिली आहे. निसर्गनियमानुसार जीवमात्राला विकास असतो. त्याला अनुसरणे म्हणजेच जिवत राहाणे होय निसर्गाच्या नियमा-विरुद्ध वागल्यास वाढ खुटते आणि नष्टचर्य ओढवतें. निसर्गाने दिलेल्या शक्तीचा जे उपयोग करतात ते वाढतात आणि जगतात. जे त्या शक्तीचा उपयोग करीत नाहींत ते खुरटतात आणि नाहींसे होतात. स्त्रीच्या ठिकाणीं प्रसवशक्ति आहे. ती नष्ट होता किंवा वाया जाता कामा नये.

पृ. ५३ ओळ १ **सोन्याची तनु** आणि **पाषाणमूर्ति** हे शब्द अनुक्रमे स्त्रीचा उपयुक्त जन्म आणि निष्ठुर देवधर्म याचे व्यजक आहेत.

.. ........४ **निष्कंप**—विरागपूर्ण.

...... ७ व ८ डार्विनच्या विकासवादानुसार हा विचार व्यक्त केला आहे. ' बीं 'नीं विधवाची समस्या पुढे माडताना भावनेपेक्षा विचाराला आवाहन केले आहे.

... . .. १५ **घरटीं**—मोठ्या जात्यात.

. ५४...२३ डार्विनच्या विकासवादात use and disuse हा विचार महत्त्वाचा आहे निसर्गाने दिलेल्या शक्तीचा उपयोग केला नाहीं तर ती नष्ट होते किंवा झडून जाते. ( उदा कागारूचे पुढील पाय व शहामृगाचे पख )

## २. चांफा

चाल--झोका देऊ या

हें एक अक्षरसख्याक छदात रचलेले प्रेमगीत आहे. चाफा हा एका प्रेमिकाचे प्रतीक आहे. त्याच्यावर अनुरक्त असणारी एक प्रिया तो प्रसन्न व्हावा यासाटीं प्रयत्नाची पराकाष्ठा करते. परतु तो काही केल्या प्रसन्न होत नाहीं. कारण त्याला अशाश्वत असे पार्थिव प्रेम नको असते तो शाश्वत अशा अपार्थिव प्रेमासाठीं आसुसलेला असतो. ते मिळताच तो प्रसन्न होतो. आणि प्रेम सुफलित होतें.

पहिल्या ३ कडव्यात प्रियेने प्रियकराला रिझविण्यासाठीं जे उपाय योजिले त्याचे वर्णन केले आहे. नतर ६ व्या कडव्यापर्यंत कडा व नदी, मेघ व वीज आणि वायु व कलिका या युगलाच्या प्रणयक्रीडेचे वर्णन आहे. हीं युगलें कल्पिताना बींनीं व्याकरणाच्या दृष्टीनेंहि लिंगविचार केला आहे. त्यामुळें कल्पना विशेष सरस झाली आहे. या पुढील तीन

कडव्यात प्रियेनें प्रत्यक्ष त्याला प्रणयातुर करण्याचा यत्न केला आहे. परतु दहाव्या कडव्यात ती जेव्हा आपण इतरेजनाप्रमाणे विषयाचे किडे नसून शुद्ध प्रेमाच्या रसाचे पान करणारे आहोत अशी त्याची खात्री पटवते तेव्हा तो फुलतो. पुढें प्रणयपूर्तीचे थोड्या शब्दात केलेलें भव्य व दिव्य वर्णन आहे.

## ३ तीव्र जाणीव·

वृत्त–शार्दूलविक्रीडित.

ही कविता मनोरजनाच्या नोव्हेबर १९१७ च्या अकात आली होती. तेव्हा तिच्यावर टीप होती,—'सुस्थितींत असलेल्या प्रत्येक राष्ट्रास शाततेचे सग्राम प्रत्यहीं करावे लागतातच या उद्याच्या स्थितींत आमच्या समाजाची काय वाट होईल ?'

कालाच्या ओघात भारतीय संस्कृतींत जे अन्याय्य जातिभेद व जी जाचक सामाजिक विषमता निर्माण झाली आहे तिच्यामुळें सर्व समाज-व्यवस्था जीर्ण व खिळखिळी झाली असून ती पुन्हा नव्याने करणे व सुधारणे आवश्यक आहे असा उदार विचार या कवितेत 'बीं'नीं माडला आहे.

पृ. ५६ ओ. १४ धागडी–बळकट.

.. ५७ ओ. १९व२० परिस्थिति आपोआप काळाच्या ओघात निर्माण होत असली, तरी ती तशी व्हावी याकरिता मानवी प्रयत्नहि आवश्यक असतो.

पृ. ५७ ओ. २३व२४ बींनीं हीं कविता लिहिल्यानतर तेरा वर्षांनीं अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळीला राजकीय स्वरूप प्राप्त झालें.

... ... २५ स्त्रियाच्या सर्वांगीण परवशतेला उद्देशून. पण आता ही स्थिति पालटत आहे.

पृ. ५७ ओ.२९व३० या ओळींत समाजातील वरिष्ठ वर्ग, पुरुष आणि परके राज्यकर्ते या सर्वांवर मार्मिक टीका आहे.

... ... ३३ते३५ या ओळींच्या मुळाशीं लोवेलच्या पुढील ओळी असाव्यात :—

They are slaves who dare not speak
For the fallen and the weak
They are slaves who dare not be
In the right with two or three

## ४. काव्यानंद.

वृत्त—शार्दूलविक्रीडित.

या कवितेत काव्याचे सामर्थ्य, स्वरूप आणि आनद याचे थोडक्यात पण प्रभावोत्पादक वर्णन आहे दैत्याची शक्ति, मारुतीचें उड्डाण, सूर्याची गति व बृहस्पतीचें वाग्वैभव—या सर्व गोष्टी काव्याच्या सामर्थ्यापुढें सामान्य आहेत. काव्याचा खरा आनद उपभोगावयाचा असेल, तर मन निर्विकल्प करून मग तो घेतला पाहिजे.

पृ. ५८ ओ. ९ते१२ 'जे शब्दांवीण संवादिजे, जे इंद्रिया नेणितां भोगिजे, बोलाआदीं झोंबिजे, प्रमेयासी' इत्यादि ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायातील ओव्या पाहा.

## ५ पिकले पान.

जाति—दिंडी.

वीसबावीस वर्षाच्या विरामानतर वार्धक्यात 'बीं' ना पुन्हां काव्यस्फूर्ति झाली होती. त्या वेळचे हें आत्मलेखन अत्यत भावनोत्कट उतरले आहे. आपण वृद्ध झालों, आता पूर्वीचा 'रस' कुठून राहाणार अशी त्यात जाणीव आहे. पण 'रस' जितका जुना व मुरलेला तितका अधिक गोड हा जगाचा अनुभव आहे. तोच हे गीत वाचताना पुन्हा प्राप्त होतो.

८. भास्कर रामचंद्र तांबे. ( १८७४–१९४१ )

ताबे याचा जन्म २७ नोव्हेंबर १८७४ सालीं ग्वाल्हेर सस्थानातील मुगावली या गावीं झाला. त्याचें घराणें मूळचें रत्नागिरी जिल्ह्यातील खेटकुई या गावचे. तें गोविंदपत बुदेल्याबरोबर उत्तरेकडे आले. ताब्याचें प्राथमिक शिक्षण काही मराठींतून व काही हिंदींतून मुगावली व देवास येथे झालें. आणि हायस्कूलचे इग्रजी शिक्षण उज्जयिनी व देवास येथे पार पडले. १८९३ सालीं मॅट्रिकची परीक्षा प्रथम श्रेणींत पास होऊनहि ताब्याना घरच्या प्रतिकूल परिस्थितीमुळे विद्यालयीन शिक्षण घेता आलें नाही विद्यार्थीदशेपासूनच काव्य हा विषय त्याच्या आवडीचा हाता. तेव्हा विद्यालयीन शिक्षणाची उणीव त्यानीं घरीच खासगी रीतीने मम्मट, विश्वनाथ, दडी आदि सस्कृतसाहित्यशास्त्रकाराचा व ब्रुक, आर्नोल्ड, ब्राडले, हडसन् आदि इग्रजी आलोचकाचा अभ्यास करून भरून काढली. सस्कृत वाङ्मयातील अभिजात कवि, प्राचीन मराठी कवि आणि इग्रजी वाङ्मया-तील शेक्सपिअर, वर्डस्वर्थ, कोलरिज, बायरन् , शेले, कीटस् , टेनिसन व ब्राउनिग या नव्या जुन्या कवीच्या कविताकृतींचें त्यानीं मार्मिक परिशलिन केले ताब्याना काव्यस्फूर्तीबरोबरच जी मार्मिक रसग्रहणाची दृष्टि लाभली तिचे मूळ त्याच्या या विद्याव्यासगात आहे.

१८९४ साली ताब्यानी देवासचे राजपुत्र खासेराव पवार याचे शिक्षक म्हणून नौकरी धरली. ते इदुरास कॉलेजात शिकत असताना ताबे त्याचे पालक म्हणून राहिले इदूरचे वातावरण ताब्याच्या प्रकृतीला मानवले. येथेच त्यानीं वाङ्मयाचा पायाशुद्ध अभ्यास केला, निरनिराळ्या साहित्यि-कार्शी चर्चा केल्या आणि सस्कृत व इग्रजी वाङ्मयातील कविताच्या अनु-करणाने अनेक सरस व सुदर कविता लिहिल्या इग्रजी साहित्याचा व्यासग चालू असताना सॉनेट या काव्यप्रकाराची अपूर्वाई त्याच्या ध्यानात आली होती. यापूर्वीं केशवसुतानी हा प्रकार मराठींत रूढ करण्याचा प्रयत्न केला होता. त्याना ताब्यानीं हातभार लावला. ताब्याचें 'गेली ज्योति विझोनिया' हें सुनीत ऐकून केशवसुतानीं रहाळकराजवळ 'ताबे हे जिवत वाणीचे निसर्गकवि आहेत' असे उद्गार काढले होते.

१९०९ ते १९१७ या अवधींत ताम्बयानीं गुदरखेडा, पिप्लोदा व प्रतापगढ या तीन ठिकाणीं शासनाच्या निरनिराळ्या अधिकाराच्या जागा-वर कामें केलीं. या अवधींतील त्याचे कवितालेखन अत्यल्प आहे. याचे एक कारण असें कीं, त्याना जी कामे मिळालीं तीं त्याच्या वृत्तीला अनुकूल अशीं नव्हती; दुसरे असे कीं, या ठिकाणीं त्याना इदूरप्रमाणे समान-धर्मे असे कोणी सोबती भेटले नाहीत, आणि तिसरे असे कीं, स्वतःला एखादी कविता स्फुरली तरी ती टिपून जपून ठेवण्याच्या बाबतींत ते सुरुवातीपासूनच निष्काळजी होते

१९२० सालीं प्रतापगढ सुटले आणि काही काल ताम्बे इदूर येथे राहिले. नतर त्याना अजमेरास मेयो कॉलेजात ग्वाल्हेर सस्थानातील सरदारपुत्राचे शिक्षक व पालक म्हणून नौकरी मिळाली. १९२३ पर्यंत ते अजमेरास होते. प्रतापगढ व अजमेर येथील वास्तव्यात ताम्ब्याच्या कवितेला अभूतपूर्व बहर आला होता. त्याच्या बहुतेक प्रसिद्ध व लोकप्रिय कविता त्यानीं या अवधींतच रचल्या आहेत.

१९२३ नतर ताम्बे शिवपूरबडोदा येथे आणि त्यानतर खास ग्वाल्हेर येथे शिक्षणखात्यात रजिस्ट्रार ऑफ एक्झामिनेशन्स् म्हणून राहिले. १९२७ सालीं इदूर येथे भरलेल्या मध्यभारतीय कविसमेलनाचें आणि १९३२ सालीं कोल्हापूर येथे महाराष्ट्र साहित्यसमेलनाच्या अतर्गत भरलेल्या कविसमेलनाचे अध्यक्षपद त्याच्याकडे होतें. १९३७ मध्ये ते सेवानिवृत्त झाले. त्यापूर्वी ग्वाल्हेरच्या अधिपतींनीं त्याना राजकवि ही पदवी देऊन आणि मासिक नेमणूक करून त्याचा गौरव केला होता. ७ डिसेबर १९४१ रोजी दम्याच्या विकारानें त्याचा ग्वाल्हेर येथें अत झाला.

उत्तरेकडील हिंदी मुलुखात आणि संस्थानी वातावरणात जीवन व्यतीत झाल्यामुळें ताम्ब्याच्या लेखणीवर व वाणीवर त्या ठिकाणचे सस्कार झाले आहेत. सर वॉल्टर स्कॉटप्रमाणे ताम्ब्यानींहि काही कविता संस्थानी वाता-वरणाच्या पार्श्वभूमीवर लिहिल्या आहेत. त्या त्याच्या अनुभवामुळें उत्कृष्ट उतरल्या आहेत.

तांबे हे कौटुंबिक कवि होते. स्त्री व पुरुष हे त्यांच्या काव्याचे विषय होते. या दोघांतील प्रणयावर त्यांनीं अनेक भावगीतें गाइलीं आहेत. त्याला त्यांनीं रसानुकूल रागरागिणींची जोड दिल्यामुळें तीं खऱ्याखुऱ्या अर्थानें भावगीतें म्हणून सार्थ झालीं आहेत.

आधुनिक मराठी कवितेला नाट्यगीत हा प्रकार तांब्यांनीं दिला. व्यक्तीच्या अंतरंगांत मुकाट्यानें प्रवेश करून त्याच्या गुप्त, लुप्त व सुप्त भावना जागृत करण्याची जादू तांब्यांना उत्तम रीतीनें साधली होती. त्यांनीं निर्माण केलेल्या व्यक्ति भावनेच्या अनुषंगानें चालतात, बोलतात व हालतात त्यांच्या मनाचे एक एक पापुद्रे हळुवार हातानें उकलण्यांत तांब्यांनीं कमाल केली आहे. या प्रकारच्या सर्व गीतांतील शब्दचित्रें इतकीं उठावदार आहेत कीं, यांना कविता म्हणावें कीं चित्र म्हणावें असा संभ्रम उत्पन्न होतो. पुन्हा या व्यक्तिचित्रांना स्वतंत्र सूर आहेत. अशा रीतीनें तांब्यांनीं चित्र, साहित्य व संगीत या तिन्ही कला एकत्र आणल्या आहेत. त्यांच्या कविता हातवारे करून गाव्या लागतात म्हणजे तात्काळ त्यांचा परिणाम होतो.

तांब्यांच्या व्यक्तिचित्रांत विविधता आहे. त्यांत लहानसहान मुलांपासून तों म्हाताऱ्याकोताऱ्यांपर्यंत सारीं माणसें समाविष्ट झालीं आहेत भाव एक असला, तरी विविध व्यक्तित्वामुळें तांब्यांचीं गीतें कंटाळवाणीं अथवा ठराविक ठशाचीं झालेलीं नाहींत.

तांब्यांनीं निव्वळ निसर्गावर अशा कविता रचलेल्या नाहींत. मानव हा निसर्गाचा उपभोक्ता. तेव्हां तो जर नसेल, तर निसर्गाला महत्त्व नाहीं असें त्यांचें मत होतें. त्यामुळें त्यांनीं मानवाच्या चित्रांना उठाव देण्याकरितां पार्श्वभू म्हणून निसर्गाचा उपयोग केला आहे

तांबे हे प्रथमपासूनच कलावादी होते. कला हेंच साधन व कला हेंच साध्य आणि प्रत्येक कला ही मूलतःच मंगलमय असते असें त्यांचें मत होतें. काव्य आणि तत्त्वज्ञान यांतील भेद ते दृष्टिआड होऊं देत नसत. काव्य हें संश्लेषणात्मक तर तत्त्वज्ञान हें विश्लेषणात्मक असतें याची त्यांना जाणीव होती. म्हणूनच त्यांनीं निव्वळ तात्त्विक अशी कविता लिहिली नाहीं.

तत्त्व हें जितकें काव्यमय करता येईल तितके करण्याकडे त्यांचें लक्ष असे. त्यामुळें त्याच्या कवितेंत सागण्यासारखें फारसें काहीं नसे किंवा जे सागण्यासारखें असे तें पालुपदातच सपत असे हा आक्षेप घेणे व्यर्थ आहे.

ताब्याचीं गूढ गीतें सूचक आहेत. गूढ म्हणजे दुर्बोधता नव्हे हे त्यानीं लक्षात घेतले होते. त्यामुळे हीं गीतें त्यानीं ध्वन्यर्थानें अथवा व्यग्यार्थानें रचलीं आहेत.

तांब्याची रचना क्वचित् सैल आणि शब्द क्वचित् गावढळ आहेत. परतु त्याच्या एकदर काव्यात जी रसधारा प्रवाहित झालेली आहे, तिच्यामुळें ते दोष दुर्लक्षित होतात.

ताबे प्रकृतीनें अशक्त असले, तरी वृत्तीनें आनदी व आशावादी होते. त्याच्या गीतात कोठेहि वैफल्याचे, नैराश्याचे अथवा व्यक्तिगत दुःखाचे सूर ऐकू येत नाहीत.

## तांब्यांचें काव्यवाङ्मय

१. ताबे समग्र कविता. २. राजकवि ताबे याचा पत्रव्यवहार. ३. ताबे व्यक्ति व कला ( यातील ताब्याचे गद्यलेख ).

**१. कुणि कोडे माझे उकलिल का ?**

जाति—प्रणयप्रभा.

पतिपत्नीमधील सहसवेदनावर या गीताची उभारणी झाली आहे. केवळ विवाहातील विधि अथवा मत्र यामुळेच या दोन जीवाचा एकजीव होत नाहीं, तर त्यास परस्परप्रेम कारण असतें हें तत्त्व यात काव्यमय केलें आहे. ते करताना प्रारभापासून अखेरपर्यंत असंगति अलकाराची समुचित माला गुफली आहे.

पृ. ६० ओ. २ **शास्त्री** म्हणजे शास्त्रज्ञ, वैज्ञानिक.

## २ घट भरे प्रवाहीं बुडबुडुनी

जाति—प्रणयप्रभा.

हें ग्रामीण वातावरणाच्या पार्श्वभूमीवर रेखलेले एक सुंदर शब्दचित्र आहे. ते वाचताना टेनिसनच्या एनॉक आर्डनमधील

Who sets her pitcher
As village girl underneath the spring
Musing on him that used to fill it for her
Hears and not hears and lets it overflow

या ओळींची आठवण होते.

पृ. ६३ ओ. ५ **प्रमदा**–सुदर स्त्री.

... . ११ सळ **डोळयावर** म्हणजे दूरवर दृष्टि टाकत असताना डोळ्याच्या कोपऱ्याचें जे आकुचन होते ते. या कडव्यात ध्वनि आहे. तू आपल्या प्रियकराची वाट का पाहात आहेस हा व्यंग्यार्थ यातून निघतो.

...६४ ओ.१५ते१८ यात त्या स्त्रीचा भ्रमनिरास आहे. '**शीळ**' हा शब्द प्रणयाच्या सकेताचा द्योतक आहे.

... ...१९ते२२ या कडव्यात निसर्गावर विनोदाचा आरोप करून त्यास मानुषी रूप दिलें आहे.

## ३. घनतमीं शुक्र बघ राज्य करी !

जाति–प्रणयप्रभा.

या कवितेत कवीचा अमर आशावाद प्रकट झाला आहे.

पृ. ६२ ओ.३ ते ६ मनावर पाखराचें रूपक आहे. अंड्यातील पांखराला ज्याप्रमाणे जग तेवढेंच आहे असे वाटते त्याप्रमाणेंच स्वतःपुरता विचार करणाऱ्या मनुष्याच्या मनाची स्थिति असते.

...६३... ९ **पहा...करुणा**–पहा, जग कसें दयेमायेनें परिपूर्ण आहे.

पृ. ६३ ओ. १० **बागुल रचणें**—अकारण स्वतःच्या दुःखाचा बाऊ करणें.

... ... ११ येथे गुलाबाचे फूल अभिप्रेत आहे.

... ... १४ **उघड नयन**—स्वतःच्या दुःखात गुरफटू नकोस. नीट पहा.
**कळ पळे दुरी**—इतरांचीं दुःखे पाहून तुला स्वतःचे दु.ख सोसण्याचे सामर्थ्य येईल.

... ...१९ते२२ मरणावर तीन कल्पना आहेत. त सुखाचे द्वार आहे. ते परमेश्वराची कृपा आहे. ते मायाळू आई आहे. त्याला भेट, भिऊ नकोस. कारण निराशेनतरच आशेचा उदय होत असतो.

## ४ मरणांत खरोखर जग जगते!

जाति——प्रणयप्रभा.

यात आत्म्याच्या अमृतत्वाची कल्पना काव्यमय केली आहे.

पृ. ६४ ओ. ९ **यज्ञ**—त्याग (Sacrifice).

... ... १८ **बढते** ( हिंदी शब्द ) म्हणजे पुढें पुढे पडते.

...६५ .. २२ **रे ! स्वभाव हा**—म्हणजे हा सृष्टिनियम आहे.
**उलटे भलते**—म्हणजे या विरुद्ध जे आहे तें विपरीत व अहितकर होय.

... ... २३ **प्रकृतिगती**—सृष्टिनियम.

... .. २४ **कार्पण्य**—प्राणाचा त्याग करण्याबाबतची कजुषी व कुचराई.

... ... २५ **जय हर**—हरहर महादेव हा रणघोष. ‘जयहर’चेंच ‘जोहर’ हे रूप आहे.
**मातेस्तव**--भारतमातेसाठी.

... ... २६ कृति न करताना केवळ मुखपांडित्य केल्यानें स्वतंत्रता प्राप्त होईल का?

### ५. जेव्हां लोचन हे.

सुनीत.

ताब्यानीं हें सुनीत अजमेर येथे ७।१२।२२ रोजीं लिहिले आहे. तेव्हा १९२० नतरच्या कालात त्यानी एकहि सुनीत लिहिले नाहीं, असा जो समज आहे तो बरोबर नाहीं. पत्नीच्या निधनोत्तर जिवत राहणे नको हा विचार या सुनीतात भावाविष्कृत केला आहे. सुनीत शेक्सपिरिअन पद्धतीचे आहे. आरभी हस्तगत न होणाऱ्या स्त्रीसौदर्याचे वर्णन आहे, पुढे काल ते हरण करील ही शका आहे, नतर कवीला आपल्या काव्यात तें अमर करून ठेवण्याचे सामर्थ्य आहे हा विचार आहे आणि शेवटीं पत्नीच्या मृत्यूबरोबरच पतीचा मृत्यु होवो ही परमेश्वरास प्रार्थना आहे. आधुनिक कवितेतील उत्कृष्ट सुनितापैकीं हें एक सुनीत आहे. याच विषया वर केशवसुताची 'काल आणि प्रियेचें सौदर्य' ही कविता आहे.

### ६. साम्राज्यवादी.

या कवितेचा लेखनकाल ८-९-२९. साम्राज्यवादी ब्रिटिशावर ही प्रखर टीका आहे. साम्राज्यवाद्याची महत्त्वाकाक्षा, सत्तेची हाव, आक्रमक वृत्ति, परस्वापहरण, दभ, आणि स्वतत्रता, समता, बधुता व शाति याचे फुकटचे पाठ या सर्वांवर यात ताशेरे आहेत.

### ७. रिकामे मधुघट.

जाति — प्रणयप्रभा.

ही कविता १९३३ सालची आहे. ताबे हे तात्त्विक कविता लिहू लागले. तेव्हा त्याच्या एका मित्रानीं त्याना लिहिलें कीं, आम्ही तुम्हास कवि म्हणून मानीत व सन्मानीत आलो आहोत. तेव्हा तुम्ही आम्हाला तुमच्या कविता द्या. तुमचे तत्त्वज्ञान नको. त्याना उत्तर म्हणून ताब्यानीं ही कविता लिहिली आहे.

**मधु** हा शब्द कवितेचा आणि **दूध** हा शब्द तत्त्वज्ञानाचा व्यजक आहे.

पृ. ६७ ओ. ३ मधुरभावनाव्यजक कल्पना.

पृ.६४ओ.७ ते १० यात कवीनें आपले वार्धक्य सूचित केलें आहे.
...... १४ यौवनातील ती हौस व ते सामर्थ्य आता आपल्यात नाहीं असे कवि सुचवितो.
.. ...१५ते १८ वार्धक्यानतरच्या मृत्यूच्या व्यजक कल्पना.

८. वाटेच्या वाटसरा

जाति—आरभीं चार ओळी अभिमन्यु-पुढें छद ओव्या.

हें एक नाट्यगीत आहे. एका युवतीने एका युवकाला विवाहाचे वचन दिलेले असते. पण पुढे तिचा विवाह दुसऱ्याच एका पुरुषाशीं होतो. तिचा ससार सुखाचा व सुरळित चालला असताना तिच्या पूर्वायुष्यातील तो युवक तिच्याकडे पाहुणा म्हणून येतो त्याच्या आगमनानें तिची जी मनःस्थिति होते तिचे हे शब्दचित्र आहे. थोड्या शब्दात निवडक कल्पनानीं ताब्यानी त्या स्त्रीच्या मनातील भाव सजीव व साकार केला आहे.

९. दत्त (१८७५–१८९९).

दत्ताचे पूर्ण नाव दत्तात्रेय कोंडो घाटे. त्याचा जन्म अहमदनगर येथें २६ जून १८७५ ला झाला. त्याचे वडील तेथील एक वकील व सार्वजनिक कार्यकर्ते होते. त्याच्या देखरेखीखालीं तेथेंच दत्ताचे प्राथमिक मराठी शिक्षण व पुढले हायस्कूलचे इग्रजी शिक्षण झाले. हें हायस्कूल अमेरिकन् मिशनने चालवलें होतें. दत्त तेथून वयाच्या १५ व्या वर्षी म्हणजे १८९० मध्ये मॅट्रिक झाले. पुढें उच्च शिक्षणासाठी त्याना आपलें घर सोडावे लागले. प्रथम ते मुबईच्या वुइल्सन कॉलेजातून १८९४ सालीं इटर झाले आणि नतर इदूरच्या ख्रिश्चन कॉलेजातून १८९८ सालीं कलकत्ता विद्यापीठाचे बी. ए. झाले. आपल्या समकालीन कवींत दत्त एकटेच काय ते ग्रॅज्युएट होते.

मॅट्रिक नतर बी. ए. होण्यास दत्ताना ९ वर्षाचा सुदीर्घ कालावधि लागला. याचें कारण कॉलेजच्या वातावरणात कालिदास, भवभूति आदि अभिजात संस्कृत कवींच्या काव्यनाटकादि वाङ्मयाच्या अध्ययनानें आणि

शेक्सपिअर, मिल्टन, वर्ड्स्वर्थ, शेले आदि इंग्रज कवींच्या कवितांनीं दत्तांचें संस्कारसुलभ अंत:करण आपलेंसे करून घेतलें. साहित्याच्या रसास्वादाबरोबरच त्यांना संगीताचाहि नाद लागला. सहज रेखाचित्रेंहि रेखाटण्याचा त्यांनीं अल्प प्रयत्न करून पाहिला. तात्पर्य, साहित्य, संगीत व चित्र या कलांच्या उपासनेत त्यांचे अभ्यासातील क्रमिक पुस्तकांकडे दुर्लक्ष झालें.

कॉलेजांत असतांनाच दत्तांच्या कवितालतेला ऐन वासंतिक बहर आला. त्यांनीं संस्कृत व इंग्रजी साहित्यातील कांहीं ललित कृतींना आदर्श म्हणून मानून त्यांच्या अनुकरणानें कांहीं कविता लिहिल्या. सतत व्यासंग आणि रेव्हरंड टिळक व चंद्रशेखर या सत्कवींचा संग, यामुळें त्यांच्या प्रतिभेचें रोप पुढें चांगलेंच पालवलें आणि यथावकाश फोफावलें. नगरास असतांना १८९६ च्या सुमारास टिळकांशीं त्यांची ओळख झाली. टिळकांच्या आग्रहामुळें व प्रोत्साहनानें दत्त बालबोधमेव्यांत मुलांसाठीं कविता लिहूं लागले.

१८९८ मध्यें ग्रॅज्युएट झाल्यावर नोकरी मिळावी या हेतूनें दत्त बडोद्यास गेले. तेथें त्यांचा चंद्रशेखरांशी अकृत्रिम स्नेहसंबंध जुळून आला. परस्परांच्या सहवासांत या दोघांच्या अनेक रात्री काव्यशास्त्रविनोदांत व्यतीत झाल्या.

दत्तांच्या अगोदरच्या पिढींत परशुरामपंतांनीं ‘नवनीता’चें संपादन करून त्यांत रामजोशापर्यंतच्या कवींच्या कवितांचा समावेश केला होता. त्यानंतर अव्वल इंग्रजींत व पुढें क्रांतिकालांत जी आधुनिक मराठी कविता निर्माण झाली होती तिच्या प्रातिनिधिक संग्रहाची अतिशय निकड होती. ती ध्यानांत घेऊन दत्तांनीं त्या प्रकारचा संग्रह तयार करण्याची कामगिरी आपल्या हातीं घेतली होती. परंतु दुर्दैवानें १८९९ मध्यें बडोद्यास प्लेग उद्भवला आणि १३ मार्चला, वयाच्या अवघ्या तेविसाव्या वर्षीं त्याला दत्त बळी पडले.

दत्तांची कविता संख्येनें थोडी आहे. पण तिच्या गुणांची गोडी मोठी आहे. तिच्यांत ऐतिहासिक ठळक प्रसंगांचें वर्णन आहे, सृष्टिसौंदर्याचें

चित्रण आहे आणि मनोविकाराचें लेखन आहे. उच्चशिक्षणाचे सस्कार झाल्यामुळे दत्ताची अभिरुचि पालटली होती. तिला पुराणपद्धति नकोशी झाली होती. कालमानाप्रमाणे कवितेचें रूपहि बदललें पाहिजे अशी तिची धारणा होती.

आधुनिक मराठी काव्यवाङ्मयात उत्कृष्ट शिशुगीताची भर प्रथम दत्तानीं घातली. त्याचीं गीते शिशूविषयी नाहीत तर प्राभुख्याने शिशूसाठी आहेत हा त्याचा विशेष आहे त्यात वात्सल्याची भावना तर आहेच. पण मुलाचा स्वभाव, त्याच मानसशास्त्र, त्याच्या आवडीनिवडी इत्यादि बाबी अधिक आहेत

दत्ताना करुण रसाचें उद्भावन विशेष साधत असे. त्यानीं अनेक करुणगीतें गाइलीं आहेत आणि तीं गातानाच समाजाच्या दोषाना सहानुभूतिपूर्वक दोष दिला आहे

## दत्तांचें काव्यवाङ्मय

### १ दत्ताची कविता.

#### १ आगगाडीस·

कवितेचा मथळा ‘आगगाडीस’ असा असला तरी वास्तविक ही कविता आगगाडीस उद्देशून नाहीं. आगगाडी किवा तिची गति ही मनाच्या अधीरतेची प्रतिमा आहे. कवि बाहेर गावाहून स्वतःच्या गावाकडे आगगाडींतून येण्यास निघाला आहे. आपली पत्नी, मुलें व मातापितरें याना भेटण्यास तो अधीर झाला आहे. त्याच्या मनातील ती अमूर्त उत्कठा या कवितेंत मूर्त झाली आहे. अशा प्रकारच्या कवितालेखनात दत्तानीं यश प्राप्त केले होतें.

पहिल्या कडव्यात सचेतन मनाचे चापल्य आणि जड शरीराचें विरोधाने वर्णन केलें आहे.

## २. निज नीज माझ्या बाळा !

जाति–अक्रूर.

हें एक नाटयात्मक विलापगीत आहे. यात कवीने एका दरिद्री परंतु प्रामाणिक मातेचें व्यथित अंतःकरण उघडें केले आहे. ती दीन दुःखी माता आपल्या वत्साचा पाळणा हाल्वताना निसर्गातील निरनिराळ्या घटनाचे क्रमशः वर्णन करीत आहे. पण तें करताना तिला दारिद्र्याशीं संबंध असणाऱ्याच उपमा सुचत आहेत. त्यामुळे हा पाळणा पाषाणास पाझर फोडील असा परिणामकारक उतरला आहे.

पृ.७१ ओ. ९ ते १३ ऐतखाऊ व मतलबी नातलगावर टीका.
.. ....... १९ नादानुकारी शब्द त्या प्रकारचा नाद व कुरकुर या दोन अर्थीं योजल्यामुळे कवितेंतले कारुण्य विशेष उत्कट झालें आहे.
...७२ ..२७ते३६ आईचे भाविक अंतःकरण.
...७३...४३ते४९ हा उपदेश स्वाभाविक असल्यामुळें हृदयगम झाला आहे.

## ३. दीपका !

वृत्त–शार्दूलविक्रीडित.

आपल्यावर परमप्रीति करणारें कुणीच नाही असा कवीच्या मनात विकल्प उत्पन्न होतो. तो या कवितेत दीपकाच्या प्रतिमेच्या द्वारें साकार केला आहे. शेवटच्या चार ओळींतील भाव इतका उत्कट झाला आहे कीं, कवीनें जणू काहीं आपले काळीजच बाहेर काढून ठेवले आहे.

पृ. ७३ ओळ १ **स्नेह** शब्दावर श्लेष. एक अर्थ प्रेम. दुसरा अर्थ तेल.
... ... ......४ **कोरडाच जळतो** म्हणजे निष्प्रेमाचें जीवन जगतो आणि रूक्षतेंत दिवस घालवतो.
... ... ......८ **क्षिति**—पर्वा, काळजी.

### ४. स्वतंत्रतेस !

वृत्त–शार्दूलविक्रीडित.

दत्तांनीं हे ऊर्जस्वल स्वातत्र्यगीत लिहिलें तो काळ राष्ट्रीय जागृतीचा होता. स्वातत्र्याचे पुजारी म्हणविणारे आणि त्याचे पोवाडे गाणारे ब्रिटिश राज्यकर्ते हिंदुस्थानात मात्र त्याच स्वातत्र्याच्या गळ्याला नख लावण्यास सिद्ध असत. ब्रिटिशाच्या या कुटिल नीतीवर या कवितेत दत्तांनीं जळजळीत टीका केली आहे.

पृ. ७४ ओ. २ मन हें नेहमींच मुक्त असल्यामुळें तें स्वातंत्र्यदेवीचे खरे मदिर आहे.

........ ३ व ४ देशभक्ताच्या शरीराला जरी कारागृहात डाबून टाकलें, तरी त्याच्या मुक्त मनाचा प्रकाश तेथें फाकतो.

पृ, ७४ ओ. ५ व ६ पाहा:—

घृष्टघृष्ट पुनरपि पुनश्चंदन चारुगधम् ।
दग्ध दग्ध पुनरपि पुनः काचन कातवर्णम् ॥ इत्यादि.

...... ११ व १२ या दोन प्रश्नार्थक चरणात ब्रिटिशाच्या विपरीत नीतीला चागलाच तडाखा दिला आहे.

### ५. शाहणी बाहुली

चाल– ला बाईला.

लहान मुलासाठीं लिहिलेलें हें गीत आहे. एक लहान मुलगी आईची भूमिका घेऊन आपल्या बाहुलीचें कोडकौतुक करीत आहे. यात लहान खेळकर मुलीचें मन आहे. ५ व्या व ६ व्या ओळींत भरपूर नाट्य आहे. ८ व्या ओळींतील विनोद कुणाच्याहि गालाला खळी पाडील असा खुसखुशीत आहे.

## १० गोविंदाग्रज ( १८८५–१९१९ )

गोविदाग्रजाचे संपूर्ण नाव राम गणेश गडकरी. त्याचा जन्म गुजराथेंत नवसारी येथें १८८५ मध्ये झाला. त्याचें प्राथमिक शिक्षण कांहीं

गुजरार्थीतून नवसारी येथें व काहीं मराठींतून कर्जत येथें झालें. आर्थिक परिस्थिति प्रतिकूल असल्यामुळें गोविंदाग्रजाना लहानपणापासूनच हाला-अपेष्टात दिवस काढावे लागले. निरनिराळ्या आपत्तींना तोड देत देत ते १९०६ सालीं वयाच्या एकोणिसाव्या वर्षी कसेबसे प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झाले. पुढे त्यांनीं फर्ग्युसन कॉलेजात प्रवेश केला. परतु प्रतिकूल परिस्थितीच्या कचाट्यात त्याना ते शिक्षण फार दिवस घेता आले नाहीं. कोठेतरी पोटापाण्याची सोय पाहणें आवश्यक असल्यामुळे त्यानीं कॉलेज सोडले आणि किर्लोस्कर नाटक मडळीत मुलाचे शिक्षक म्हणून नोकरी धरली. ही नौकरी करीत असतानाच त्याच्या नाट्यप्रतिभेचा विकास झाला.

विद्यार्थीदशेपासूनच गोविदाग्रजाचें निरनिराळ्या ग्रथाचें वाचन जबर होतें. त्याचा व्यासग सतत चालू असे. सताचे साहित्य, मोरोपताचे आख्यानक काव्य, शाहीराच्या लावण्या व पोवाडे--या सर्वांचा त्यानीं कसून अभ्यास केला होता. ऐतिहासिक पत्रव्यवहार व बखरी वाचून त्यातील भाषाशैलीवर त्यानीं प्रभुत्व सपादन केलें होते. अशा तऱ्हेच्या अफाट वाचनामुळे गोविदाग्रजाची शब्दसपदा सपन्न व समृद्ध होती. आपल्या कवितात व नाटकात त्यानीं ती मुक्त हस्तानीं उधळली आहे. गोविदाग्रजाच्या ठिकाणा सयमाचा अभाव असल्यामुळे क्वचित् ती फापटपसाऱ्याप्रमाणे झाली आहे.

गोविंदाग्रजाना बालपणापासूनच कवितालेखनाचा छद होता. १९०६ सालीं 'अल्लड प्रेमास' ही त्याचीं कविता प्रथमच मासिक मनोरजनात प्रसिद्ध झाली. त्यानतर सहासात वर्षांनीं त्याच्या कवितेला इतकी लोकप्रियता प्राप्त झाली कीं, तिच्याशिवाय मनोरजनाचें पान उलटेनासे झाले. कल्पकता हा गोविंदाग्रजाच्या काव्यप्रतिभेचा प्रमुख गुण होय. त्याच्याइतका कल्पक दुसरा कवि झाला नाहीं. त्याची कल्पनाशक्ति जितकी सूक्ष्म व तरल तितकीच आकाशांत उच उड्या मारून भरारणारी होती. त्याच्या काव्य-नाटकात सर्वत्र तिचा सचार आढळतो. कल्पनाच्या बाबतीत ते कुबेर होते. जेथे जेथे सधि मिळेल तेथे तेथें औचित्य असो किंवा नसो, त्यानीं कल्पना उधळल्या आहेत.

आरभीं आरभी गोविंदाग्रजाच्या काव्यात जो प्रतिभेचा प्रज्वलित स्फुलिंग होता, तो पुढे पुढें हळुहळू मंदावत गेला. १९१३ पासून ते नाट्यलेखनाकडे वळले. प्रेमसन्यास, पुण्यप्रभाव, एकच प्याला व भावबधन हीं त्याच्या चढत्या वाढत्या प्रतिभेची एकाहून एक सरस अशीं फळे होत. या यशस्वी नाटकामुळें त्याची लोकप्रियता शिगेला पोचली.

विनोदाच्या बाबतींतहि गोविंदाग्रजाचा हातखडा होता. त्याचा विनोद अतिशयोक्त असला तरी मार्मिक व सूक्ष्म आहे. त्याच्या ठिकाणीं वाचकाना भरपूर हसवण्याचें अचाट सामर्थ्य आहे गोविंदाग्रजाचे विनोदी लेख बाळकराम या टोपण नावाने 'रिकामपणाची कामगिरी' या पुस्तकात एकत्रित केलेले आहेत गोविदाग्रजाच्या कवितेलाहि विनोदाचे वावडे नाहीं. गोविदाग्रज जगाला शिव्याशाप देताना किवा त्यावर सतापताना दिसत नाहींत. समाज सुधारावा यासाठीं ते त्याचा उपहास करतात आणि स्वतः-बरोबर त्याला हसावयास लावतात.

गोविदाग्रजाना अवघें ३५ वर्षांचें आयुष्य लाभले. परतु तेवढ्या अल्पावधींत त्यानीं गुणदृष्ट्या अमोल वाङ्मय निर्माण करून मराठी वाङ्मयात आपले नाव अजरामर करून ठेवले आहे. त्याची प्रतिभा अलौकिक होती आणि भाषाप्रभुत्व असाधारण होतें. गोविंदाग्रजाना अल्प आयुष्यात अनेक तापदायक प्रसग अनुभवावे लागल्यामुळें त्याच्या अनेक कवितावर शोकाची करुणकोमल सावली पसरली आहे. त्याच्या काहीं कवितात अशा रीतीने निराशा आढळली, तरी ती उदासरम्य आहे. साराश, सुरस व चमत्कारिक कल्पना, सुदर व वेचक शब्द आणि गोड निराशा यामुळे गोविदाग्रजाचे काव्य काहीं निराळे व आगळे झालें आहे. २३ जानेवारी १९१९ ला सावनेरास रक्तक्षयाच्या विकाराने गोविदाग्रजाना मृत्यु आला.

## गोविंदाग्रजांचें काव्यवाङ्मय

### १ वाग्वैजयंती.

**१. ती कोण?**

सुनीत.

**भाव व विचार या दृष्टींनीं मराठी साहित्यांतील हें एक उत्कृष्ट सुनीत आहे.**

आहे प्रस्तुत सुनीतात गोविदाग्रजाचे स्वतःचें मनोलेखन आहे. सुनीत शेक्सपिरिअन पद्धतीचे आहे. आरंभींच्या चार चरणात निसर्गामध्यें निरनिराळ्या काल्पनिक जोडप्यात जी प्रणयक्रीडा दृष्टीस पडते तिचें वर्णन आहे. जलधि-नदी, रसिक-कविता, चद्र-कुमुदिनी व दिवस-रात्र हीं जोडपीं निर्दिष्ट करताना गोविदाग्रजानीं व्याकरणदृष्ट्या स्त्रीपुरुषलिंगाचा विचार केला आहे. पुढील चार ओळीत प्रेमाच्या सापेक्षतेचा विचार माडला असून त्याबाबतची आपली निराशा विफल वाक्यात व्यक्त केली आहे.

अशा रीतीनें मध्यवर्ती विचाराला कलाटणी दिल्यानतर शेवटच्या सहा चरणात त्या निराशेच्या भावनेची पराकाष्ठा केली आहे. त्यामुळे हें सुनीत परिणामकारक झाले आहे

## २. विरामचिन्हें

वृत्त—शार्दूलविक्रीडित

इग्रजी वाङ्मयाच्या सपर्काने आपल्या वाङ्मयात विरामचिन्हांची आयात झाली परतु त्याना पाहून कल्पना स्फुरली ती मात्र गोविंदाग्रजानाच ! त्याचे निरीक्षण किती सूक्ष्म होते आणि कल्पनाशक्ति किती अमोघ होती त्याचे हे एक सुदर उदाहरण आहे.

शेक्सपिअरने आपल्या As You Like It या नाटकात मानवाच्या जीवनावर नाटकातील सात अकाचे रूपक बसवले आहे. त्याच मानवजीवनावर गोविंदाग्रजानीं ही अगदींच नवी व निराळी कल्पना आरोपित केली आहे.

## ३ प्रेम आणि मरण

जाति—नृपममता. शेवटीं अनुष्टुप्.

प्रस्तुत कविता कथनात्मक आहे तिच्यात वीज आणि वृक्ष याच्या प्रेमाची अमर कथा आहे. ती सागताना गोविदाग्रजानीं आपलें स्वतःचे भावनामय अतःकरण तिच्यात ओतले आहे. त्यामुळें ती कथा अतिशय

उत्कट झाली आहे. पुन्हा तिच्यात प्रेम करणाऱ्या जीवाच्या जीवनाची आणि मरणाची काव्यमय मीमांसा केली आहे. त्यामुळे तिच्यात एक प्रकारची जादू निर्माण झाली आहे. कवितेंत वर्णनाचा आवश्यक तेवढाच तपशील दिला आहे. भर मुख्यत: प्रेमासाठीं स्वार्थत्यागाची केवढी परमावधि करावी लागते या तत्त्वावर दिला आहे. त्यामुळे कविता अव्वलपासून अखेरपर्यंत असर करणारी झाली आहे. कवितेत मधून मधून जुन्या शाहिराच्या लावण्यापोवाड्यातील वेंचक व अर्थगर्भ शब्द अत्यंत चप्खल रीतीनें पेरले आहेत. त्यानी कवितेच्या शोभेत ज्यादा भर पडली आहे.

पहिल्या चार कडव्यात वृक्षाच्या मनात विजेसबधीं प्रथम दर्शनीं जें प्रेम उत्पन्न होते त्याच्या प्रभावाचें वर्णन आहे.

पृ. ७८ ओ. १३ **कर्माचें विंदान** - नशिबाचा खेळ, कौतुक.

... ... १४ **आन**—दुसराच, निराळा.

... ७९ २३व२४ यात प्रेमाच्या प्रभावाचे अतिशयोक्त वर्णन करून सत्याचा भास निर्माण केला आहे.

... ३३व३४ या पालुपदात हटयोगाच्या कल्पनेशेजारींच विसदृश अशी रोगाची कल्पना केवळ योगाशीं रोगाचें यमक साधते म्हणून माडली आहे गोविंदाग्रज शब्दाच्या आहारीं कसे जात त्याचा हा एक नमुना आहे. प्रेमाला हटयोग म्हणण्यात त्याची अदम्य शक्ति सूचित केली आहे. पण रोग म्हणण्यात त्याचे वैकल्य जे आपणास अभिप्रेत नाहीं, तें व्यक्त होईल हें गोविंदाग्रजाच्या लक्षात आले नाही

स्वत:चा ज्या गोष्टीशीं अर्थाअर्थीं काहीं सबध नाहीं तिची चर्चा करावयाची व तिच्यावर टीका करावयाची या सामाजिक प्रवृत्तीवर पाचव्या कडव्यात मार्मिक प्रहार आहे. कथेत त्यामुळे सत्याचा आभास उत्पन्न झाला आहे.

सहाव्या कडव्यांत विषयग्रस्तता म्हणजे आत्मनाश हा सिद्धांत काव्य-मय भाषेंत उलगडून दाखविला आहे.

कडवीं ७, ८ व ९ यात अद्‌भुताचा उपयोग केला आहे. पण त्या-मुळें कवितेंतील प्रतिपाद्य तत्त्वाचा परिपोष झाला आहे. पुन्हा वास्तवतेला कोणत्याहि प्रकारचा ढळ पोचलेला नाहीं हे विशेष.

दहाव्या कडव्यात प्रेमहीन अमरतेचा धिक्कारपूर्वक उपहास आहे.

पृ.८१ओ.७९व८० पाहा:—

It is better to have loved and lost than never to have loved at all — Tennyson

कडवी ११ व १२ यात प्रेमाच्या सफलतेत मरणाचा महिमा आहे हें तत्त्व काव्यमय केलें आहे, शेवटचा अनुष्टुप म्हणजे नाटकी परिणामाचें ( dramatic effect ) उत्तम उदाहरण आहे.

## ४ अल्लड प्रेमास.

आयुष्याच्या आरभापासून तो अतापर्यंत गोविंदाग्रजाना जगाचा जो कटु अनुभव आला त्यातील कडवटपणा या विरक्तवृत्तिपर भावोत्कट कवितेत प्रकट झाला आहे. गोविंदाग्रजाच्या कवितेंत कल्पना फार. पण या कवितेत केवळ भाषाविष्कार आहे. कवितेत सामाजिक टीका आहे. ती योग्य व मार्मिक आहे.

पृ. ८२ ओ. ६ व ७ जगाच्या चाचल्यावर टीका.

८३-१०,११व१२ स्वार्थी, पापी व दिखाऊ समाजाचे सत्यस्वरूप.

... १४,१५व१६ विवाहसस्था, धार्मिकविधि व साहित्यशास्त्र यातील जाचक बधनावर प्रहार.

पृ. ८३ ओ. २५ ही सुदर कल्पना अर्थान्तरन्यासासारखी आहे. तिच्यात थोड्या शब्दात भरपूर अर्थ सामावला आहे.

## ५. गोफ.

जाति—फटका. शेवटीं अनुष्टुप.

प्रस्तुत कवितेंत गोविंदाग्रजानीं स्वतःचे मनोलेखन केलें आहे. यात

त्याच्या अस्थिर व चंचल प्रीतिजीवनाच्या विफलतेचें हृदयस्पर्शी निवेदन आहे. परतु तें करताना गोफाच्या खेळाच्या प्रतिमेचा अवलंब केला आहे. हीच गोफाची कल्पना त्यानीं भावबधनातील 'कठिण कठिण कठिण किती पुरुषहृदय बाई' या पदातील 'प्रेमाचा सुदरसा गोफ गुंफिती' या चरणात माडली आहे. स्त्रीपुरुष परस्पराच्या सहवासात प्रेमाचे पाश विणतात खरे, परंतु पुढें ते तुट्ट न देता उकलणें अतिशय अवघड जातें 'बधनानि खलु सन्ति बहूनि। प्रेमबंधनसम न हि किंचित्।' या सुभाषितात हेंच तत्त्व अनुस्यूत आहे.

पृ.५४ओ.११व१२ यात प्रतिपक्षावर दोषारोप आहे.

५५...२१व२२ अशा वास्तवपूर्ण पण चमत्कारिक कल्पनानीं काव्य परिणामकारक करण्याची गोविंदाग्रजाची रीति असे.

## ६. परमाणूंचें कार्यमाहात्म्य.

जाति–फटका.

यात गोविदाग्रजाचे सूक्ष्म निरीक्षण आणि तत्त्वसशोधन दिसेल. परमाणु म्हणजे वाळूचे लहान लहान कण. त्याना आपण यःकश्चित् समजतों. परतु त्याचा महिमा कसा आहे तो या कवितेंत गोविंदाग्रजानीं दाखविला आहे.

पृ. ८५ओ.९व१० यात गोविंदाग्रजाचा विनम्रभाव व्यक्त झाला आहे. मसि म्हणजे शाई.

## ७. चिंतातुर जंतु.

जाति–फटका, शेवटी अनुष्टुप.

प्रत्येक वस्तूच्या उपयुक्ततेचा ऊहापोह करणारे काही फाजील अर्थ-शास्त्रज्ञ आढळतात त्याच्या अतिरेकी व एककली विचारसरणीवर या कवितेंत उपरोधपूर्ण विनोदी टीका आहे.

गोविंदाग्रजाच्या ठिकाणीं बुद्धि व भावना या दोन्ही वस्तु सारख्याच प्रमाणात होत्या. त्यामुळें त्याच्या कविता जशा भावनाप्रधान तशा बुद्धि-प्रधानहि आहेत. त्याच्या कवितासग्रहात प्रेम आणि मरण या कविते-सारख्या तत्त्वगभीर कविता जशा आढळतात, तशाच चिंतातुर जतु या

कवितेसारख्या हास्यप्रचुर विनोदी कविताहि दृष्टीस पडतात. यासबंधीं एका टीकाकारानें म्हटले आहे:—'It is usually those who see the comic side of life that can best understand and express its serious and tender side' तें गोविंदाग्रजाना ततोतंत लागू पडतें.

## ८. फूल ना फुलाची पाकळी.

जाति–फटका. शेवटीं–अनुष्टुप.

प्रस्तुत कवितेंत गोविंदाग्रजानीं गुणैकदृष्टीचें महत्त्व स्पष्ट केलें आहे. माणसाच्या गुणाकडे पाहावें, दोषाकडे दुर्लक्ष करावे असे त्याच्या साग-ण्याचे तात्पर्य आहे. कारण काळाच्या ओघात गुणाचे स्मरण राहतें. दोष स्मरणीय नसल्यामुळे त्याचें महत्त्व टिकत नाहीं. थोडक्यात असे कीं, गुणाचे स्वरूप शाश्वत तर दोषाचें अशाश्वत आहे.

पहिल्या चार कडव्यात शहाजहान, कालिदास, वाल्मीकि व श्रीकृष्ण याच्या जीवनातील दोषाकडे जग कसे दुर्लक्ष करतें, गुणाना महत्त्व देते तें दाखविलें आहे. हा क्रम श्रीकृष्णाकडून शहाजहानाकडे असता तर कालानुक्रम साधला असता.

सातव्या कडव्यात या कवितेला प्राणभूत असणारें तत्त्व सुभाषिताच्या रूपानें सागितलें आहे.

शेवटच्या अनुष्टुपात गोविंदाग्रजानीं रसिकाना आपल्या एकदर जीवन-क्रमाकडे पाहू नका, तर फक्त त्यातील जो भाग प्रशसनीय आहे त्याचाच स्वीकार व पुरस्कार करा अशी विनवणी केली आहे.

## ११. एकनाथ पांडुरंग रेंदाळकर ( १८८७– १९२० ).

रेंदाळकराचा जन्म १ जुलै १८८७ ला कोल्हापूर नजिकच्या रेंदाळ गावीं झाला. त्या गावचे हे वतनदार कुलकर्णी. परतु घराण्यात निर-निराळ्या चुली झाल्यावर वाटयास आलेल्या अल्प हिस्शात ससाराचा गाडा चालविता येणें शक्य नसल्यामुळे याचे वडील त्याच गावात एका व्यापाऱ्या-कडे नौकरीस राहिले. या गावातच रेंदाळकराचें प्राथमिक शिक्षण झालें.

शाळेंत ते विद्यार्थी होते तेव्हांपासूनच त्याना काव्य, नाटक, कादबरी इत्यादि ललित वाङ्मय वाचण्याचा हव्यास जडला. त्यांच्या वडिलाना ज्ञानेश्वरी, अमृतानुभव आणि सतप्रणीत ग्रथ वाचण्याचा नाद होता. त्याचाहि रेंदाळकराच्या बालवयातील सस्कारसुलभ मनावर परिणाम झाल्याखेरीज राहिला नाही.

रेंदाळकराचे मराठी चौथीनतरचे पुढील इग्रजी शिक्षण कागलला झाले. येथेच त्याना प्रथम कवितारचनेची प्रेरणा झाली. येथे इग्रजी चौथींत ते अभ्यास करीत असताना अकस्मात् त्याचे वडील वारले, त्यामुळे त्याचा एक बळकट आधार तुटला. ते हताश झाले. त्याच्या मनाला विराग उत्पन्न झाला आणि सतसाहित्याच्या पारायणात ते आपला काल क्रमू लागले. त्याचे इग्रजी शिक्षण येथेच थाबलें काही कालानतर ते येथूनच व्हर्नाक्युलर फायनल परीक्षा पास झाले. तींत कोल्हापूर केंद्रातून त्याचा क्रमाक पहिला आला होता.

१९०५ सालीं चिक्कोडी तालुक्यातील कुन्नूर या गावी रेंदाळकरानीं मराठी शाळेत असिस्टट मास्तराची जागा पत्करली. या सुमारास त्याचें कवितालेखन चालूच होते. परतु त्याकरिता सस्कृत भाषेची आवश्यकता आहे ही जाणीव उत्पन्न होताच ते सागलीस निघून गेले आणि तेथें व कोल्हापुरास त्यानीं जुन्या पद्धतीनें रघुवशादि पचमहाकाव्याचा आणि सिद्धातकौमुदीचा बराचसा भाग आत्मसात् केला कोल्हापुरास सुप्रसिद्ध सस्कृतपडित बाळशास्त्री हुपरीकर हे त्याचे गुरु होते. सस्कृतभाषा त्याच्या कवितालेखनास साहाय्यभूत झाली

अशा रीतीनें कुन्नूर, सागली व कोल्हापूर येथे पाच वर्षे जाऊन येऊन काढल्यावर १९१० च्या सुमारास रेंदाळकर कोल्हापुरास कायमचे येऊन राहिले. तेथे त्याना सुरुवातीस विजयी मराठा या पत्राच्या व पुढें धर्मविचार या मासिकाच्या सपादकाची जागा मिळाली. या नियतकालिकातून 'मदार' या नावानें त्यानीं आपली कविता प्रसिद्ध केली आहे. ती पाहून त्याचे गुरु हुपरीकर याना परम आनंद झाला.

त्यानीं आपल्या शिष्याचा यथोचित गौरव केला आणि शंकराचार्यांनी त्याना कविभूषण ही पदवी प्रदान केली.

१९१० ते १९१४ हा चार वर्षांचा काळ रेंदाळकराच्या प्रतिभेच्या उत्कर्षाचा होय. महाराष्ट्रातील बहुतेक नियतकालिकातून त्याची कविता या सुमारास येत होती आणि कवि म्हणून सर्वत्र त्याची कीर्ति पसरत होती. १९१० च्या सुमारास त्याचा विवाह झाला परतु त्याच्या पत्नी या स्वभावताच हट्टी, विक्षिप्त व तऱ्हेवाईक असल्यामुळे रेंदाळकराना जन्मभर त्रास झाला.

धर्मविचार मासिक बद पडल्यावर रेंदाळकर मुबईस सुप्रसिद्ध मनोरजन मासिकाच्या कचेरींत सपादकाचे साहाय्यक म्हणून नौकरीस राहिले. रेंदाळकराचा हा वेळपर्यंतचा काळ लहानसान मर्यादाच्या गावी गेला होता. जगातील निरनिराळ्या जनाच्या चमत्कारिक स्वभावाची त्याना ओळखपाळख नव्हती. त्याचा स्वभाव साधासुधा, सरळ व मोकळा होता. त्याचा काहींनी अवास्तव फायदा घेतला. क्वचित् त्याचा उपमर्द झाला पुन्हा मनोरजनासाठीं आलेल्या कविताची निवड करण्याचें कार्य त्याच्याकडे असल्यामुळे त्यानी ज्याच्या कविता साभार परत केल्या त्या कविजनानाहि रेंदाळकराविरुद्ध काहूर माजविण्यास कारण सापडले याच सुमारास रेंदाळकरानीं निर्यमक कवितेची तरफदारी चालविली होती. विविधज्ञानविस्तारात लेख लिहून ते तिचे समर्थन करीत होते त्याच्या विरोधकाना वादासाठी हेंहि एक आयतेच भाडवल मिळाले घरात विचित्र पत्नीचा उपसर्ग आणि बाहेर हितशत्रूच्या टीकेचा मारा यामुळे रेंदाळकर कावून गेले. त्या सतापाच्या भरात त्यानी काही उद्वेगपर कविता लिहिल्या आहेत त्या स्वाभाविक असल्या तरी त्यातली वृत्ति मात्र अभिनदनीय नाही. रेंदाळकराच्या विरोधकानी त्याच्या सच्छीलावर शिंतोडे उडतील असा देखील प्रचार खासगी सभाषणाच्या व लेखाच्या द्वारें चालविला होता. हा प्रकारहि गर्हणीय होता.

पहिल्या युरोपीय महायुद्धाची आच लागल्यामुळें मनोरजनाचे संपादक कै. मित्र याना रेंदाळकराना दूर करावे लागलें. तेंव्हा रेंदाळकर पुण्यास

कै. हरिभाऊ आपटे याच्या 'करमणुकी'चें काम पाहू लागले. या सुमारास हरिभाऊनीं चिपळूणकर आणि मंडळीसाठीं महाभारताचा उपसहार लिहिण्याचे कार्य हातीं घेतले होतें. त्याची टिपणे काढण्याचे जबाबदारीचें काम त्यानीं रेंदाळकरावर सोपविलें होते. हरिभाऊच्या मृत्यूमुळें हीं कार्यें अपुरीं राहिलीं. शेवटीं रेंदाळकर कन्यांच्या महिला-श्रमात शिक्षक राहिले. परतु त्याची प्रकृति खालावत असल्यामुळें ते इचलकरजीला गेले. येथे त्याच्या पत्नी निधन पावल्या. रेंदाळकराना क्षय झाला होता. प्रकृति सुधारावी म्हणून त्यानीं अनेक उपाय केले शेवटीं ते आपल्या मूळगावीं रेंदाळला जाऊन राहिले. तेथेंच २० नोव्हेंबर १९२० ला त्याचा अत झाला.

रेंदाळकरानी सस्कृत, इंग्रजी, बंगाली व प्राचीन मराठी या चारहि भाषाचा व त्यातील साहित्याचा मार्मिक अभ्यास केला होता. सस्कृत कवींपैकीं कालिदास व बाण हे त्याचे आवडते कवि होते माइकेल मधुसूदन दत्त, तोरुलता दत्त, द्विजेंद्रलाल रॉय आदि बगाली कवींच्या कृतींचे मूळाबरहुकूम भाषातर करून त्यानीं आधुनिक मराठी कवितेच्या वैभवात अमोल भर टाकली आहे. टेनिसनच्या एनॉक ऑर्डन वरून त्यानीं 'सारजा' हें काव्य लिहिलें आहे. लॉगफेलो आणि ईला व्हीलर विलकॉक्स् या अमेरिकेतील कवि व कवयित्रींच्या लहान लहान कविताचीं त्यानीं इतकी बेमालूम रूपातरें केलीं आहेत कीं त्याचें मूळ परके असावें असा सशयदेखील येत नाहीं.

रेंदाळकराचे वृत्तरचना व भाषा या दोन्हींवर असाधारण प्रभुत्व होतें. कोणताहि विचार अथवा भाव त्याना सहजगत्या हवा त्या वृत्तात व्यक्त करता येत असे. त्याच्या ठिकाणी लेखनाचा असा उरक असल्यामुळें नेहतीस वर्षाच्या अल्प आयुष्यात त्यानीं आपल्या समवयस्क कवींच्या मानाने विपुल काव्यनिर्मिति केली आहे. रेदाळकरांच्या कविताचे विषयहि विविध व अद्ययावत् आहेत. त्याच्यातून त्यानीं उदारमतवादाचाच पुरस्कार केला आहे.

# रेंदाळकरांचें काव्यवाङ्मय

१ रेंदाळकराची कविता. प्रथमखंड.

२. रेंदाळकराची कविता. द्वितीय खंड.

## १ प्रबोधन

जाति—उषा.

प्रबोधन म्हणजे जागृत करणें. ऑगस्ट १९११ च्या मनोरंजनात ही कविता पति पत्नीस उठवीत आहे या सचित्र स्वरूपात प्रसिद्ध झाली होती. कवितेतील सुरस प्रणयभाव, तिची गेय रचना, तिच्यातील मृदुल मधुर शब्दाची योजना आणि प्रभातकाळचें हृदयगम वर्णन यामुळें ही कविता त्या काळीं महाराष्ट्रात सर्वत्र प्रसार पावली होती.

पृ. ८९ ओ. १८ हे वेचक शब्द बाणाच्या कादबरींतील आहेत.

## २ भाऊ भाऊ आम्ही सारे भाऊ.

जाति—भूपाळी.

'वाल्मीकेर जय' या बगाली पुस्तकावरून कै. वासुदेव गोविद आपटे यानी मराठींत 'वाल्मिकीचा जय' हें पुस्तक लिहिलें होते. त्यात विश्व-बंधुत्वाची विशाल व व्यापक भावना प्रस्फुटित झाली होती. ते पुस्तक वाचून रेंदाळकराना ही कविता स्फुरली होती. [पाहा. मनोरजन सप्टे. १९११.]

पृ. ८९ ओ.९व१० 'आत्मवत् सर्वभूतेषु' किवा 'आत्मौपम्येन सर्वत्र' या प्रकारची बुद्धि. 'हें विश्वचि माझे घर' अशी बुद्धि. 'भाऊ भाऊ' ही कल्पना Brotherhood शब्दावरून.

...९० ओ. २२ **अद्वैत**—एकत्व (Union) या अर्थाने.

## ३ काव्यदेवीला·

वृत्त—पृथ्वी.

माइकेल मधुसूदन दत्त याच्या एका बगाली चुटक्याचा या कवितेस मुग्ध

आधार आहे. हिच्यात कवितेवर नेहमींप्रमाणे वनितेचा आरोप केला असून यमकावर तिच्या पायातील बेड्याचा आरोप केला आहे. या बेड्याचें बधन तिच्या स्वाभाविक विकासास व लीलाविलासास जाचक आहे असा विचार इथे माडला असून निर्यमकत्वाचे काव्यमय समर्थन केले आहे.

रेंदाळकरापूर्वी घटय्या नायडूनी १८८३ च्या सुमारास निर्यमक कविता लिहिण्याचा प्रयत्न केला होता परतु १९१०-११ च्या सुमारास रेदाळकर व नागेश या मित्रद्वयानीं मोठ्या हिरीरीने तिचा प्रचार केला. तेव्हा या चळवळीचे श्रेय रेदाळकराकडे जातें.

पृ ९१ ओ. १२ **जान्हवी**–गगेचे नाव.

आठव्या महाराष्ट्र साहित्य समेलनात केशव विश्वास फणसे यानीं निर्यमक कवितेचा अर्ज सादर केला होता. आधुनिक मराठी कवितेच्या इतिहासात त्यातील पुढील ओळी व विचार याना महत्त्व आहे.

‘ होतें आजवरी अनाथ विजनी, त्या एकनाथें परी–
धैर्यें शीघ्र सनाथ की करुनिया प्रेमे जनीं आणली
नागेशादिकही मदीय असती ते पाठिराखे जगी
माझे भक्त न होति काय आजि ह्या साहित्यसमेलनी ?
माझ्या शैशवि तेवि नृत्यसमर्यी सगीतकी शोभलीं
माझीं सुदर नूपुरे सुयमके स्वाभीष्टकाची भलीं
आता तीं शिशुनूपुरे, मम पुरे, घ्या मोद अर्थें रसे
स्त्रीते प्रौढवयात नूपुरझणत्कार त्रपा देतसे.

[ पाहा–वि. ज्ञा. वि. व म. सा. प. वर्ष २ अ. ७, ८ व ९ ].

## ४. काय बरे झाल !

जाति–वीरभ्रमरा.

इग्रजी वाङ्मयात Pastoral हा एक काव्यप्रकार आहे. त्यात ग्रामीण वातावरणाचें चित्रीकरण असते. आणि त्या वातावरणाच्या पार्श्वभूमीवर तेथें वास्तव्य करणाऱ्या धनगराचें जीवन रेखाटलेले असते. रेंदाळकराचा हा प्रयत्न त्या प्रकारचाच असून कल्पनातीत यशस्वी झाला आहे. कवितेतील चटका आरभापासून अतापर्यंत जसाच्या तसा कायम राहिला आहे.

## ५. अजुनि चालतोंचि वाट

जाति—उषा

या आर्त व आर्द्र भावगीतात रेंदाळकरांचें व्यथित मनोलेखन आहे. उभ्या आयुष्यात त्याना कधी विराम वा विरगुळा मिळाला नाही अस्थिर आयुष्यात त्याना अनेक स्थळीं हिंडावे लागलें. आणि अनेक आपत्तींशीं झुजावे लागले. अखेर ते थकून भागून आपल्या मूळ गावीं रेंदाळला परत आले. त्या व्याकुल मनःस्थितींत त्यानी हे अखेरचें गीत गाइले आहे.

जीवन हा रूक्ष माळरानावरील प्रवास आहे. मृत्यूचे विश्रामस्थान केव्हा येणार ते काही कळत नाही, असा या गीताचा आरंभ असून मध्ये पश्चात्तापाचे उद्गार आहेत. शेवटी शोकाची परमावधि झाली आहे. मराठी वाङ्मयात इतके करुणकोमल गीत दुसरें नाही.

## १२ बालकवि ( १८९०—१९१८ ).

बालकवींचे पूर्ण नाव त्र्यंबक बापूजी ठोमरे त्याचा जन्म खानदेशात धरणगाव येथे १३ ऑगस्ट १८९० रोजी झाला. येथे त्याचे वडील पोलीस खात्यात होते. त्याच्या वारवार बदल्या होत. त्यामुळे बालकवीं-च्या मराठी प्राथमिक शिक्षणाची बरीच हेळसांड झाली.

१९०५ किंवा १९०६च्या आसपास एरंडोलास एक कीर्तनकार आले होते. त्याचे नाव रामभाऊ वैद्य. हे वनवासी या नावानें कविता लिहीत आणि गावोगाव मराठे व रजपूत याच्या इतिहासातील संस्मरणीय व ऊर्जस्वल प्रसंगावर कथा करीत हिंडत बालकवीच्या वडिलानीं बाल-कवींना त्याच्या स्वाधीन केलें. त्याच्या सहवासात अंतःकरणात मूळ धरून असलेली बालकवींची काव्यस्फूर्ति अंकुरित झाली. हे वनवासी बालकवींना बरोबर घेऊन उज्जयिनी येथे गेले होते. तेथें त्यावेळीं कॉलऱ्याची साथ जोरात पसरली होती. तिलाच वनवासी बळी पडले. वनवासी वारल्या-वर बालकवि जळगावास परत आले. येथे त्याची वडील बहीण जीजी होती. तिनेहि पुत्रवत् असलेल्या आपल्या लहान भावाची प्रतिभा पल्लवित व्हावी यासाठीं त्याला अनेकदा उत्तेजन दिलें होतें.

बालकवि काहीं काळ इंग्रजी शिक्षणासाठीं आपल्या वडील बंधूंबरोबर धुळ्यास जाऊन राहिले होते. १ मार्च १९०७ या दिवशीं जळगावास एक कविसमेलन भरले. डॉ. कीर्तिकर हे या समेलनाचे अध्यक्ष होते. या प्रसगीं बालकवींचें वय १७ वर्षांचें होतें. त्यानीं धीटपणें व्यासपीठावर येऊन आपल्या काहीं कविता म्हणून दाखविल्या. त्या उपस्थित सज्जनाना फारच आवडल्या. तेव्हा बालकवींच्या अलौकिक प्रतिभेचा गौरव म्हणून डॉ. कीर्तिकराच्या हस्ते त्याना एक जरीच्या वस्त्राचे पान देण्यात आलें. या प्रसगावर माधवानुजाची एक कविता आहे. बालकवींचे मित्र गोविंदाग्रज यानीं 'नव कवितेच्या जरिपटक्याचा तुलाच अधिकार' असे जे उद्‌गार पुढे काढले, ते याच प्रसगास उद्देशून आहेत

या समेलनानतर एक वर्षानेच म्हणजे १६ फेब्रुवारी १९०८ रोजीं बालकवींच्या वडिलाचे देहावसान झाले. या वेळीं देशात वगभगाची चळवळ जोरात चालू होती. बालकवींचे वडील बधु चळवळ्ये होते. बालकवींनाहि चळवळीत पडावें असें वाटत होते. तोंच त्याच्या आईनें त्याचे लग्न उरकून टाकले.

लग्नानतर बालकवींनीं नाशिक व एरडोल येथे राहून शिक्षणाचा खटाटोप करून पाहिला. पण त्यात त्याना यश आले नाहीं. शेवटीं ते बडोद्यास कलाभवनात शिकण्याकरिता गेले. हा काळ १९०९ चा होय. याच सालीं बडोद्यास कर्नल कीर्तिकराच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र साहित्य समेलन भरलें. त्यात बालकवींची कीर्तिकर, रे. टिळक इत्यादिकाशीं गाठ पडली. दोन वर्षांपूर्वीं जळगावच्या कविसमेलनात याच सज्जनानीं त्याचा गौरव केला होता. या भेटींत कीर्तिकरानीं बालकवींना दहा रुपये शिष्यवृत्ति द्यावी आणि त्यानीं टिळकाजवळ नगरास राहून पुढील अभ्यास करावा असें ठरलें. त्याप्रमाणे बालकवि नगरास टिळकाकडे जाऊन राहिले आणि मिशनस्कूलात पाचव्या वर्गात अभ्यास करूं लागले. त्यानीं निदान मॅट्रिक तरी व्हावे अशी टिळकाची इच्छा होती. परंतु बालकवीना मधून मधून उदासीनतेचे झटके येत. त्यामुळें ते हायस्कूलचा अभ्यासक्रम अखेरपर्यंत पार पाडू शकेल नाहींत.

नगरच्या वास्तव्यात बालकवींचा अनेक मिशनऱ्यांशीं सबंध आला. त्याना शिकविणारे मराठी पडित म्हणून त्याना उन्हाळ्यात महाबळेश्वरास जाऊन राहाण्याची अनेक वेळा सधि सापडली. तेथील निसर्गशोभेचें निरीक्षण करण्यात बालकवींनीं दिवसाचे तासचेतास घालवले. अरुण, संध्यारजनी, फुलराणी, निर्झर इत्यादि काव्यविषय त्याना या प्रवासातच स्फुरले.

मध्यंतरीं १९११ च्या सुमारास बालकवि पुण्यास केसरी ऑफिसात राहिले होते. येथे असताना कलापी या नावाने केसरींत त्यानीं काव्य-विषयक काहीं लेख लिहिले. परतु पुढे लवकरच ही जागा सोडून ते नगरला पुन्हा परत आले. आता त्याना नौकरी करणे भाग होते. तेव्हा टिळकाच्या शिफारशीने ते मिशनस्कूलमध्यें सस्कृत व मराठी शिकवूं लागले.

१९१४ च्या जूनमध्ये बालकवि पुन्हा पुण्यास गेले. त्याचे हें जाणे टिळकाना पसत नव्हते याच प्रसगावर टिळकानीं 'पाखरा! येशिल का परतून?' ही कविता लिहिली आहे. या वेळी पुण्यास गोविंदाग्रज होते. त्याची व बालकवीची गट्टी जमली होती. बालकवीची वृत्ति मधून मधून उदास होई. त्याचा स्वभाव काहीसा लहरी होता तेव्हा १९१६ च्या मे मध्ये त्यानीं एकाएकीं पुणे सोडले व नेवाळीस ते आपल्या थोरल्या बधूकडे राहू लागले. परतु येथे त्याना बरे वाटले नाही. तेव्हा १९१७ मध्यें ते नगरास पुन्हा परत आले आणि परत मिशनस्कुलात मास्तर झाले.

१९१८ च्या एप्रिलमध्यें बालकवि जळगावखुर्दला आपल्या भाचीच्या लग्नास गेले होते. तेथें असताना त्याना त्याचे मित्र सोनाळकर याची 'जळगावला ये' अशी तार आली. तेव्हा जळगावला जाण्यासाठीं ते भादली स्टेशनपर्यंत आले. तोंच लेव्हल क्रॉसिंगजवळ त्याचा एक जोडा रुळात अडकला. ते तो सोडवण्याच्या प्रयत्नात होते. तोच त्याच्या अगा-वरून मालगाडीचें एक एजिन गेले आणि त्याखालीं त्याचा अत झाला.

बालकवींनीं सर्व प्रकारच्या विषयावर कविता लिहिलेल्या असल्या, तरी त्यात सृष्टिसौदर्यवर्णनपर कविता सख्येनें अधिक आहेत, आणि त्याबद्दलच त्याचा आधुनिक कवीत लौकिक आहे. बालकवींचा निसर्ग हा वर्डस्वर्थच्या निसर्गा-

प्रमाणेच चैतन्यमय आहे. वर्डस्वर्थप्रमाणें बालकवींनीहि निसर्गावर मानुषी भावनाचा आरोप केला आहे. पण वर्डस्वर्थच्या कवितात जी अतर्मुखता आहे ती बालकवींच्या कवितात दिसत नाहीं. वर्डस्वर्थ उपदेशकाचा अथवा नीतिपाठकाचा जसा आव आणतो तसा तो बालकवि आणीत नाहींत हें सौदर्याच्या दृष्टीनें युक्तच आहे परतु या प्रकारच्या कवितात जे सखोल चिंतन असावयास हवे ते बालकवीच्या कवितात आढळत नाही. याला कारण कदाचित् त्याचे बालवय असावे.

निसर्गाचीं रेखीव आणि यथातथ्य वर्णने हा बालकवींच्या या प्रकारच्या कवितांचा एक फार मोठा गुण आहे. त्याच्या शब्दात निव्वळ जादू किंवा टोणाच नाहीं, तर नाद, रग, रस, गध व स्पर्श हे ज्ञानेंद्रियानी अनुभविण्याचे सूक्ष्म व तरल गुणहि आहेत त्याची या प्रकारची कविता वाचताना जणू काही आपण धबधब्याचा धबधब असा आवाज ऐकत आहोत, सायकालीन मेघाच्या रगाची चिताड पाहात आहोंत, पावसाळ्यातील पाण्याचे थेंब वरच्यावर झेलून पीत आहोत, विशुद्ध कापराचा गध हुगत आहोत आणि मऊमऊ मखमालीवर लोळत आहोत असा भास झाल्याशिवाय राहात नाहीं.

बालकवींची भाषा गीतगोविंदाच्या भाषेप्रमाणेच सरस व कोमलकान्त पदावलीने युक्त आहे तिच्यात कोठे कठोर वर्ण नाहींत की कोठे यतिभग नाहीत. ती वाचत असताना जणू काहीं आपण शारदीय चद्रप्रकाशात एकाद्या शात सरोवरात नौकाविहार करीत आहोत असे वाटते.

बालबोधमेवा व आनद या मासिकासाठी बालकवींनी काही शिशुगीते लिहिली होतीं. त्यात बालाचा स्वभाव उत्तम रीतीने निदर्शित झाला आहे.

बालकवींची कवित्वशक्ति अलौकिक खरी पण तिला ठराविक मर्यादा होत्या. ती तारे, फुले, चद्र, सूर्य, पर्वत व नद्या याच्यापलिकडे फारशी गेली नाहीं. हे सारे विषय लिहून होताच बालकवींचे लेखन मदावलें. शिवाय उदास वृत्तीमुळे त्यानीं बरेच लेखन अपूर्ण स्थितींतच सोडून दिले. त्याच्या अखेरअखेरच्या कवितावर तीव्र निराशेची छाया पडली आहे.

तिच्यावरून आयुष्याच्या आरंभीं 'आनंदी आनंद गडे' असें म्हणणारा हा कवि अतीं विषण्ण झाला होता असें दिसतें.

## बालकवींचें काव्यवाङ्मय.

### १. बालकवीची समग्र कविता.

**१. फुलराणी.**

जाति—पादाकुलक.

आदल्या दिवशी सायकाळीं निमीलित असलेली एक कळी दुसऱ्या दिवशी सूर्याच्या स्पर्शाने उमलते. तिचे जणू सूर्याशीं लग्न लागतें अशी कल्पना करून हे काव्य लिहिले आहे. फुलराणी म्हणजे एक कळी हा शब्द खास कवीचा आहे.

पृ. ९४ ओ. ३ **अव्याज**—निष्कपट, सरळ.

... .. ४ **प्रणयचंचला भ्रूलीला**—प्रेमभावनेने मनात चलबिचल झाली म्हणजे तरुण तरुणी परस्पराना सकेत करीत भिंवया उडवतात.

... .. ५ **आई**—म्हणजे लता.

दुसऱ्या कडव्यात सध्यावाताला विनोदी म्हटलें आहे. कारण तो फुलराणीची व इतराची इतकी थट्टा करावयाचा, कीं तीं हसता हसता अगदी गडबडा लोळू लागत.

पृ. ९४ ओ० १० **संध्येतून**—सधिकाळात अर्धा उजेड, अर्धा अधार असतो तेंव्हा जणू काहीं ती खिडकीची फट आहे व सूर्य तींतून डोकावत आहे अशी कल्पना.

...... . ११ **रविकर**—कर शब्दावर श्लेष. कर म्हणजे किरण किंवा हात. कारण फुलराणीचें सूर्य पाणिग्रहण करणार होता.

......... १३ **आदोलीं संध्येच्या**—सध्याकाळीं उजेड मिणमिण करीत लोपतो आणि रात्र हळूहळू पसरते, तेंच रात्रीचें संध्येच्या झोपाळ्यावर बसून झुलणें होय.

रजनी काळी असते आणि काळ्या स्त्रिया जादूटोणा करतात असा एक समज असतो तो येथें योजला आहे.

पृ. ९४ ओ० १८ **लागेना डोळ्याशीं डोळा**–उमलणाऱ्या कळीच्या पाकळ्या विलग होत असतात तेंच डोळ्याला डोळा न लागणे.

पृ. ९५ ओ० १९ **दिवट्या**–म्हणजे येथें काजवे.

... ... ... २५ **कुणी कुणाला आकाशांत**–निरनिराळे तारे एकमेकाना.

.. ... ... २८ **तों**–उजाडण्यापूर्वी थोडावेळ अगोदर.

... .. ... २९ **व्योमींच्या प्रेमदेवता**–तारका. झाडावर नवीन अनेक कळया उमलल्या त्याच जणूं वाऱ्याच्या पायऱ्यावरून खाली उतरल्या.

... ... ... ... **केलि करण्या**–खेळण्यास.

पृ. ९५ ओ० ३० **त्या वदल्या . राणी**–कारण फुलराणी उमलणारी कळी होती.

... ... ... ३१ **स्वर्भूमीचा वात**–पहाटवारा वरपासून खालपावेतों वाहतो तो स्वर्ग व भूमि यांचें मीलन घडवतो.

... ... ... ३४ सूर्य आपल्याला वरणार याबद्दल कळीला आता शंका राहिली नाहीं.

... ... ... ३८ **मोतीं–दंव.**

... ... ... **दिव्य वऱ्हाडी**–लग्नाकरिता येणारी अरुण, पूर्व दिशा, रंगीत मेघ इत्यादि तेजस्वी पाहुणे मडळी.

... ९३ ... ४३ **मंगलपाठ**–मगलाष्टकें.

**सृष्टीचे भाट**–पक्षी.

... ... ... ४८ **भेटे.. फुलराणीला**–सूर्याचा कर कळीला लागताच ती फुलली.

... ... ... ५१ **उच्छ्वासांहीं**–झुळुकींनी किंवा वाफानीं.

... ... ... ५३ कवि व स्फूर्ति हें जोडपें.

## २ श्रावणमास.

श्रावणातील पावसाचें चित्रमय वर्णन.

पृ. ९६ ओ० २ **शिरवें**—पावसाची सर.

पृ. ९७ ... १६ **भामारोष**—सत्यभामा श्रीकृष्णावर त्यानें पारिजातक रुक्मिणीच्या अंगणात लावला म्हणून रुसली होती.

पृ. ९७ ओ. १७ **पुरोपकंठी**--शहराजवळ राहणाऱ्या.

## ३ तारकांचें गाणें.

जाति—बालानंद.

चप्खल रीतीनें बसविलेले नादानुकारी आणि अर्थानुरोधी शब्द व स्त्रीस्वभावसुलभ संवाद यामुळें या गीताची मधुरता वृद्धिंगत झाली आहे. गीताची चाल भावानुगामी आहे. त्यांतील कल्पना अभिनव व हृदयंगम आहेत. विशेषत' पाचव्या कडव्यातील कल्पना हृद्य व आस्वाद्य आहे. शेवटच्या कडव्यातील शेवटच्या तीन ओळींत कवीने आपल्या ज्योतिर्ज्ञानाचा उपयोग काव्याचे सौंदर्य खुलविण्याकडे करून घेतला आहे.

## ४ पारवा.

जाति-दिंडी.

वयाच्या अवघ्या २८ व्या वर्षी आयुष्याच्या अखेरीअखेरीं बालकवींच्या मनाचा स्थिति निराशामय झाली होती. एकातात अकारण कुढत बसावें ही सवय त्याना जडली होती. तिचें प्रतिबिंब या कवितेंत पडलें आहे. एकलकोंड्या व शांतवृत्तीच्या पारव्याला उपलक्ष करून बालकवींनीं आपले हृदय या कवितेंत उघडे केलें आहे.

पृ ९९ ओ. १३ **विखारे नको, विकारें हवें.**

............१९ **हा चरण दुर्बोध आहे.**

## ५. मेघांचा कापूस.

जाति—चद्रकात.

बालकवींच्या अखेरच्या उदासीन मनःस्थितींत ही कविता अपूर्ण राहिली आहे. तिच्या शेवटच्या तीन ओळींवरून ती एखाद्या खडकाव्याच्या सुरुवातीचा भाग असावी असे वाटतें. निरनिराळ्या रगाचीं रूपें शब्दात साकार करण्याचे सामर्थ्य बालकवींच्या ठिकाणीं किती मोठ्या प्रमाणात होतें, हे या कवितेतील आरभींच्या ओळींवरून सिद्ध होईल.

## ६ औदुंबर

जाति—भूपाळी

अचूक शब्दाच्या आलेख्ययत्राने हे औदुबराचें हुबेहूब छायाचित्र घेतलें आहे. या कवितेतील शब्द वाचताना स्मृतीच्या पडद्यावर खरोखरच औदुबराचे चित्र उमटते.

## ७ उदासीनता

जाति—पादाकुलक.

बालकवींच्या नेहमींच्या मनःस्थितीचे हें शब्दचित्र आहे. बालकवींवर लिहिलेल्या मृत्युलेखात टिळक म्हणतात, "त्याना आग्ल कवि William Cowper याच्याप्रमाणें क्षुद्र कारणानें किवा कधीं कधीं निष्कारणहि जीवाला कटाळण्याइतकें विमनस्क होऊन बसण्याचा विकार होता."

